श्री



# भोजराजा आणि कालिदास यांच्या गोष्टी

[ ज्ञानवर्धक व मनोरंजक अशा ३९ गोष्टी
या पुस्तकांत दिल्या आहेत. ]





जगदीश्वर बुक डेपो, माधवबाग, मुंबई ४

# अनुक्रमणिका





# भोजराजा आणि कालिदास

## यांच्या ज्ञानवर्धक व मनोरंजक गोष्टी

### राजा भोज याचें चरित्र

सुमारें एक हजार वर्षांपूर्वी भोजराजा नांवाचा एक सुसंस्कृत व विद्वान् असा राजा होऊन गेला. ज्याला हल्लीं धार अथवा किल्लेधार असें म्हणतात ती धारानगरी भोजराजाची राजधानी होती. भोजप्रबंध या संस्कृत भाषेंतील ग्रंथांत भोजराजासंबंधीं अशी माहिती मिळते कीं, भोजराजाचा बाप मरण पावला तेव्हां भोजराजा फारच लहान होता. म्हणून मरणापूर्वीं भोजराजाच्या बापानें आपल्या धाकट्या भावास जवळ बोलाविलें आणि सर्व राज्य त्याच्या हवालीं करून सांगितलें कीं, " माझा पुत्र भोज ह्या राज्यपदाचा खरा वारस व मालक आहे; परंतु तो अज्ञान असल्यामुळें आज हें सर्व राज्य मी तुझ्या हवालीं करतों. त्याचें यथान्याय संरक्षण करून भोज वयांत आला म्हणजे तें त्याच्या हवालीं कर. " तें भोजराजाच्या चुलत्यानें मान्य केलें.

भोजराजाच्या चुलत्याचें नांव मुंजराजा. त्यानेंही धारानगरीचें राज्य भावाप्रमाणेंच निःपक्षपातानें व न्यायानें चालविलें. त्यामुळें त्याच्यावर प्रजा प्रीति करूं लागली व त्याला देवाप्रमाणें मान देऊं लागली. त्यानें भोजराजाचा विद्याभ्यास चांगला व्हावा, म्हणून निरनिराळे गुरु व उपगुरु ठेविले होते. राजा भोजहि मन

लावून अभ्यास करीत असल्याकारणानें लवकरच तो नाना प्रकारच्या विद्या, कला व कुशलता यांत प्रवीण झाला. विशेषतः न्याय, व्याकरण, तर्क व काव्य हे विषय भोजराजास फारच प्रिय होते. सोळा वर्षांचा होतांच त्याला शिकविणाऱ्या गुरूंनीं मुंजराजाकडे जाऊन विनंति केली कीं, " महाराजांनीं राजपुत्राची सभेंत परीक्षा पहावी आणि आमच्या श्रमाचें सार्थक करावें." ती विनंति मुंजराजानें मान्य करतांच सर्वांस अत्यानंद झाला व सर्व आपापल्या स्थानीं निघून गेले. त्या रात्रीं गुरूंनीं भोजराजास कळविलें कीं, " उद्यां राजसभेंत तुमची परीक्षा घेण्याचें ठरलें आहे. " तें ऐकून भोजराजास समाधान वाटलें.

परीक्षा घेण्यसाठीं ज्या जागेची योजना केली होती ती जागा नाना प्रकारचे ध्वज व तोरणें लावून फारच सुशोभित केली होती. नियमित वेळीं निरनिराळ्या विषयांची परीक्षा घेणारे परीक्षक आणि राजभक्त नागरिकजन आनंदानें येऊन आपापल्या दर्जाप्रमाणें योग्य स्थानीं व्यवस्थितपणानें बसले व राजासह राजपुत्र केव्हां येतात याची वाट पाहूं लागले. थोड्याच वेळांत मुंजराजा आपल्या राजकीय परिवारासह येऊन सिंहासनावर बसला. तो येतांच सर्व सभासद, सरदार मानकरी यांनीं त्याचा जयजयकार करून त्यास उत्थापन दिलें व सर्वांनीं मुजरे केले. त्या दिवशीं सभेला कांहीं विलक्षण शोभा आली होती. मुंजराजा आपल्या भावाच्या पश्चात् पुष्कळ वर्षें राज्य करीत होता; पण त्या दिवसासारखी सभेची रचना त्यानें कधींच पाहिली नव्हती. असो. सर्व सभासद व भोजराजाचे एकंदर शिक्षक सभेंत येऊन

बसले आहेत असें पाहून मुंजराजानें भोजराजास सभेत घेऊन येण्यासाठीं चोपदार पाठविला.

राजसभेंत आपली परीक्षा होणार म्हणून भोजराजा आनंदानें प्रफुल्लित झाला होता. परीक्षेच्या दिवशीं शौचमुखमार्जनादिक नित्यविधि, स्नान व थोडासा उपहार करून तो तयार झाला व राजसभेंतून चोपदार येतांच सभेंत येण्यासाठीं निघाला. त्या वेळेस नाना प्रकारचीं मंगलवाद्यें वाजूं लागलीं. भोजराजा सभेंत येतांच सर्व सभेनें त्याचा आणि त्याच्या बापाच्या नांवाचा आनंदानें जयजयकार केला ! मुख्य प्रधानानें भोजराजाचा हात धरून त्याला एका सिंहासनावर नेऊन बसविलें. भोजराजाची मूर्ति पाहतांच त्याच्या बापाची सर्वांस आठवण होऊन ते त्याचे गुण आठवूं लागले. तसेंच भोजराजाची हुषारी, चपलता व समयोचितपणा पाहतांच, आतां हा आपलें राज्य सांभाळण्यास योग्य झाला आहे, परमेश्वर याला दीर्घायु करो, असें सर्व लोक म्हणूं लागले व त्याच्यावरील आपली अतोनात भक्ति ते उघड दर्शवूं लागले.

परंतु त्याचा मुंजराजाचे मनावर विपरीत परिणाम झाला. इतके दिवस यथान्याय राज्य चालवूनहि राज्यांतील लोक भोजराजावर अतोनात प्रेम करीत आहेत असें पाहतांक्षणीं तो बावरल्यासारखा झाला आणि त्या वेळेपासून त्याच्या मनांत भोजराजाविषयीं द्वेष उत्पन्न झाला. तरीपण समयास साजेल असें थोडेंसें भाषण करून त्यानें परीक्षक बोलाविले व भोजराजाची निरनिराळ्या विषयांत परीक्षा घेण्याचें काम चालू झालें. आधींच भोज राजपुत्र बुद्धिमान्, त्यांत मन लावून अभ्यास केलेला

असल्याकारणानें कसल्याही बिकट प्रश्नाचें त्यानें ताबडतोब उत्तर द्यावें आणि सभासदांकडून वाहवा व शाबासकी मिळवावी. पण अशा तऱ्हेनें भोजराजाचा झालेला सन्मान पाहून सिंहासनावर बसलेल्या मुंजराजाच्या अंगाला आग लागल्यासारखें वाटूं लागलें. सर्व परीक्षा झाल्यावर आमचा भावी राजा सर्वगुणसंपन्न आहे, असें नागरिकजन मोठ्यानें बोलूं लागले. शेवटीं अश्वारोहण, तिरंदाजी, निशाण, भाला मारणें, पट्टा खेळणें इत्यादि गोष्टींतील नैपुण्य पाहून भोजराजा प्रवीण झाला आहे, असें सर्व सभासद मुंजराजाजवळ मोठ्या आनंदानें सांगूं लागले. तें ऐकून मुंजराजाच्या मनाला वाईट वाटत होतें. तरी जनाला दाखविण्यासाठीं त्यानेंही आनंद झाल्यासारखें दाखविलें आणि भोजराजाच्या सर्व शिक्षकांस योग्यतेप्रमाणें बक्षीस देऊन त्यांची रवानगी केली. त्याचप्रमाणें मुंजानें भोजराजास बोलावून त्यालाही शाबासकी दिली आणि त्याला त्याच्या मंदिरांत जाण्याची आज्ञा करून तो स्वतः मनांत अतिशय कष्टी होऊन एकांतीं जाऊन विचार करीत बसला.

मुंजराजा आपल्याशींच म्हणाला, " प्रजाजनांची बुद्धि किती कृतघ्नपणाची आहे पहा ! भावानें देह ठेवल्यापसून अतिशय कष्ट सोसून मी हें राज्य चालविलें. प्रजेला योग्य न्याय देऊन इतकें सुख दिलें; पण तें कोणीच मनांत आणीत नाहीं. आज त्या भोजाची हुषारी पाहतांच माझी मुर्वत सोडून सर्व लोक त्याच्या बापाच्या व त्याच्या नांवाचा जयजयकार करूं लागले. यावरून एवढेंच सिद्ध झालें कीं, आजपर्यंत न जाणतां मी आपला एक

शत्रूच वाढविला! कांहीं दिवसांनीं तो मला पदच्युत करून आपल्या मनाप्रमाणें राज्य करणार!" अशा तऱ्हेचे विचार करीत असतां शेवटीं आपला हा शत्रु जगांतून नाहींसा करण्याची त्याला दुर्बुद्धि सुचली व भावाच्या मनांतून कांहीं कारणामुळें जो सरदार उतरला होता आणि जो पुष्कळ दिवसपर्यंत आपली नेमणूक न घेतां हट्टानें तसाच राहिला होता, त्याच्याकडे हें काम सोंपविण्याचें ठरवून त्याला त्त्यानें बोलावणें पाठविलें. त्याला निरोप पोहोंचतांच मोठ्या त्वरेनें तो मुंजराजाच्या एकांतांत दाखल झाला. त्याला मुंजराजानें मोठ्या प्रेमानें आपल्या अर्ध्या आसनावर बसविलें व मोठ्या प्रेमानें तो गोष्टी करूं लागला. पण तो सरदार जरी पूर्वीच्या राजाच्या मनांतून उतरलेला होता तरी मोठा धूर्त व शहाणा असून एकंदर राजकुळावर भक्ति ठेवणारा व विश्वासू होता आणि भोजराजाविषयीं त्याचें मन निर्मळ होतें, हें मुंजराजाच्या लक्षांत आलें नाहीं. मुंजराजाचा खरा मनोदय समजण्याकरितां तो म्हणाला, "आज महाराजांची मुद्रा फार चिंतेंत दिसते आणि ज्यापेक्षां मला एकांतांतच बोलावून आणिलें आहे त्यापेक्षा कांहीं तरी गुप्त काम सांगण्याचा स्वामींचा मनोदय असावा. तरी कोणत्याही गोष्टीविषयीं मला आज्ञा करावी म्हणजे मी तें कार्य ताबडतोब करून दाखवितों!" तें भाषण ऐकतांच मुंजराजास फार आनंद झाला व तो म्हणाला, माझ्या भावानें तुमचा जो अपमान व नुकसान केलें तें भरून काढण्याचा माझा विचार आहे; परंतु त्यापूर्वीं तुम्ही माझें एक गुप्त कार्य केलें पाहिजे!"

याप्रमाणें मुंजराजाचें भाषण ऐकतांच त्या स्वामिभक्त सरदाराच्या मनांत संशय उत्पन्न झाला; परंतु तो व्यक्त न करतां तो

म्हणाला, "महाराज, अशा संदिग्ध भाषणानें मजसारख्या अज्ञान शिपायास कोणत्याही गोष्टीचा बोध होत नाहीं; यास्तव आपल्या मनांत जें असेल तें स्पष्ट सांगावें, म्हणजे ती आज्ञा शिरसावंद्य समजून आपणास निष्काळजी करण्यास एका क्षणाचाही अवकाश लागणार नाहीं!" असें ऐकतांच मुंजराजा म्हणाला, "हे महावीरा! सांप्रत हें राज्य जरी मी करीत आहें, तरी लवकरच तें मला सोडावें लागेल. राजपुत्र भोज ह्या जगांतून नाहींसा करशील तरच ही राज्यश्री माझ्या हातीं राहील. हें काम तूं केल्यास तुझी पूर्वींची नेमणूक तुला परत देऊन एक मोठें बक्षीस देईन व सरदारांहून तुझा अधिकारही वाढवीन!"

मुंजराजाचे हे शब्द ऐकतांच त्या स्वामिभक्त सरदाराचे अंगावर रोमांच उभे राहिले. तरी त्यानें असा विचार केला कीं, जर ह्या वेळेस आपण उपदेश करूं लागलों तर तो ह्याला रुचणार नाहीं. शिवाय आपण हें काम करण्याचें नाकारलें तरी हा दुसरे कोणाला सांगून त्या राजपुत्राचा घात करविणार. तरी हें काम आपणच पत्करून तूर्त ह्याची कृपा संपादन करावी आणि राजपुत्राचें रक्षण करावें. असा विचार योजून सरदार म्हणाला, "महाराज, आपले आज्ञेप्रमाणें व्यवस्था करण्यास मी तयार आहें; तरी आपले मनोदयाप्रमाणें एक हुकूम देऊन ठेवावा, म्हणजे तो अंतकाळीं भोजराजास दाखवून त्याचा शेवट करण्यास ठीक पडेल. योग्य संधि पाहून कोणासही न कळवितां मी केव्हां तरी त्याला एकट्याला अरण्यांत घेऊन जाईन आणि तेथें सर्व व्यवस्था करून आपणांस पाहण्यासाठीं कांहीं तरी खूण घेऊन परत

येईन. आपण त्याबद्दल आजपासून अगदीं निष्काळजी असावें!" तें भाषण मुंजराजास खरें वाटून त्यास फारच संतोष वाटला व त्यानें भोजास ठार मारण्याबद्दल त्या सरदारास लेखी हुकूम आणि मूल्यवान बक्षिसें देऊन त्याची रवानगी केली.

नंतर त्या सरदारानें थोड्या दिवसांनीं भोजराजाची भेट व सलगी करून घेतली आणि सड्या स्वारीनिशीं कोणासही न कळवितां शिकारीस जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें भोजराजा एके दिवशीं पहाटेस आपल्या मंदिरांतून पोषाख करून बाहेर पडला व त्या सरदाराचे घरीं आला आणि ते दोघे दोन चपळ अश्वांवर बसून सूर्योदयापूर्वी शहराबाहेर दहा कोसांवरील एका निबिड अरण्यांत जाऊन उभे राहिले. तेथें गेल्यावर मुंजराजाचा लेखी हुकूम सरदारनें भोजराजाचे हातांत दिला आणि तो वाचून पाहण्यास सांगितलें. भोजराजानें आपल्या चुलत्याचें अक्षर ओळखलें आणि पत्रांतील मजकूर वाचून त्याला फार आश्चर्य व वाईट वाटलें. परंतु तेवढ्यांत धैर्य धरून भोजराजा संतोषानें मरण्यास तयार झाला. तें पाहतांच त्या सरदारास आश्चर्य वाटलें. जरी त्याच्या मनांत भोजराजाचा प्राण घेण्याचें नव्हतें, तरी त्याच्या धैर्याची आणखी परीक्षा पाहण्याकरितां तो सरदार म्हणाला, "महराज, राजाचा हुकूम पाहतांच आपण मरण्यास सिद्ध जाहलां आहां, तर आतां एक वेळ ईश्वरस्मरण करून आपल्या चुलत्यास कांहीं निरोप सांगण्याची इच्छा असेल तर सांगावा आणि पूर्वाभिमुख होऊन बसावें, म्हणजे एका हाताबरोबर आपली मोकळीक करून शहरांत निघून जातों!" तें ऐकतांच भोजानें सांगितलें, "अहो, आपण

माझा वध करून काकांच्या जवळ गेलांत म्हणजे त्यांस माझा निरोप सांगा कीं, आजपर्यंत नल, राम, युधिष्ठिर, शिबी इत्यादी अनेक पुण्यश्लोक नृपति या पृथ्वीचा उपभोग घेऊन शेवटीं तिला दुसऱ्याचे हवालीं करूनच परलोकीं निघून गेले. परंतु, तुम्हीं मात्र या जन्मीं तिचा चिरकाल उपभोग घेऊन शेवटीं या सर्व वैभवासह स्वर्गास किंवा परलोकास जाणार आहां असे समजून मी आपला प्राण आपल्या उत्पन्नकर्त्यांच्या हवाली केला आहे. राज्य व लक्ष्मी बरोबर घेऊन आपण परलोकीं यावें. एवढी माझी इच्छा पूर्ण करण्यास अनमान करूं नये. शेवटीं आपणास अनंत व अक्षय प्रणाम असोत!" एवढा निरोप सांगून भोजराजा मरणाकरितां पूर्वाभिमुख खालीं मान करून बसलेला पाहतांच त्या सरदाराच्या पोटांत भडभडून आलें व नेत्रांवाटें अश्रुप्रवाह वाहूं लागले. त्यानें चट्दिशीं आपल्या हातांतील शस्त्र दूर फेकलें आणि भोजराजाच्या चरणांवर मस्तक ठेवून म्हटलें, "महाराज, धन्य धन्य! आपलें औदार्य आणि धैर्य हीं दोन्ही वर्णन करण्यायोग्य आहेत. मुंजराजाचें कपट समजल्यामुळें मी हें कार्य मुद्दाम हातीं घेतलें व आपलें प्राण रक्षण करण्याचा माझा निर्धार आहे, तरी आतां आपण माझ्याबरोबर पुनः नगरांत चलावें आणि आपल्या पितृव्याचें मन शुद्ध होईतोंपर्यंत गुप्तपणें माझ्या घरांतच वास्तव्य करावें, अशी माझी प्रार्थना आहे!" असें बोलून सरदारानें भोजराजास प्रेमानें आलिंगन दिलें. सायंकाळ होईपर्यंत तेथेंच राहून मध्यरात्रीं ते दोघे धारानगरींत परत आले. त्या दिवसापासून भोजराजा गुप्तपणानें त्या सरदाराच्या घरांत राहिला

मुंजानें मात्र, भोज कोणासही न कळवितां दूर देशीं निघून गेला अशी बातमी चोंहोंकडे प्रसिद्ध करून त्याच्या शोधाकरितां बरेचसे सेवक रवाना केले.

भोजासह गुप्तपणानें शहरांत आल्यावर त्या सरदारानें आपल्या वाड्याच्या तळघरांत भोजराजाची राहण्याची व्यवस्था केली आणि त्याच्या अंगावरील पोशाख मागून घेऊन तो बोकडाच्या रक्तांत भिजविला व दुसऱ्या दिवशीं मुंजराजास नेऊन दाखविला. तो पुतण्याच्या रक्तानें भरलेला पोशाख पाहतांक्षणींच मुंजास समाधान वाटलें व कबूल केल्याप्रमाणें त्यानें त्या सरदारास मूल्यवान् बक्षीस व नेमणूक दिली. पुतण्याच्या मृत्यूमुळें आपणांस राज्य लाभलें ह्या विचारानें त्यास कांहीं काळ समाधान वाटलें. पण पुढें त्या खुनाच्या पापामुळें त्याच्या चित्तास उद्वेग उत्पन्न झाला व त्याला चैन पडेना. पुढें त्या चिंतोद्वेगामुळें कांहीं दिवसांनीं तो आजारी पडला व आपल्या अंतकालाचा समय अगदीं समीप आला असें त्याच्या मनांत आल्यावर त्यानें ज्या सरदारास भोजराजाला मारण्याचा हुकूम केला होता, त्याला आपल्याजवळ बोलावून आणलें आणि " भोजानें अंतकळीं कांहीं निरोप सांगितला होता काय ? " असें विचारिलें. तेव्हां त्या सरदारानें भोजराजाचा निरोप अक्षरशः त्याला सांगितला. तो ऐकतांच मुंजराजास पूर्ण पश्चात्ताप होऊन भोजराजाची भेट होईल तरच तो जगेल असें दिसूं लागलें. मुंज एकसारखा " हे चतुर बालका भोजा ! आतां तूं मला कसा भेटशील ? " असें म्हणून गडबडां लोळूं लागला. तेव्हां त्या सरदारानें भोजराजास उत्तम पोषाख देऊन मुंजाच्या भेटीस

आणिलें. त्यास पाहतांच मुंजानें त्याच्या गळ्यास मिठी मारून त्याजपाशीं कृतकर्माबद्दल क्षमा मागितली व सर्व राज्याधिकार त्यास देऊन तो स्वतः तपोवनांत चालता झाला. नंतर भोजराजानें एक कुलशीलयोग्य वधु पाहून तिच्याशीं लग्न केलें आणि मोठ्या चातुर्यानें आपलें राज्य चालविलें. भोजराजा स्वतः विद्वान् असल्याकारणानें त्याच्या आश्रयास कित्येक पंडित होते. पण त्या सर्वांत कालिदास नांवाचा जो कवि व पंडित होता त्याची राजाजवळ फारच मान्यता असे.



# कालिदास

रघुवंश या नांवाचें महाकाव्य व शाकुंतल वगैरे सुप्रसिद्ध संस्कृत नाटकें विक्रमादित्यकालीन कालिदासानें लिहून एवढी कीर्ति मिळविली कीं, कालिदास हें नांव महापंडिताचें निदर्शक होऊन बसलें. भोजराजाचे वेळीं असाच एक कालिदास नांवाचा महापंडित होऊन गेला. भोजराजाजवळ जो कालिदास कवि होता तो जातीचा कनोजी ब्राह्मण होता. ह्या कालिदासासंबंधानें पुढील कथा सुप्रसिद्ध आहे. एका राजाची कन्या व त्याच्या प्रधानाचा पुत्र हीं दोघें लहानपणीं एकाच गुरूजवळ विद्याभ्यास करीत होतीं. त्यामुळें पुढें त्यांच्यांत स्नेहभावही वाढत चालला. प्रधानाचा पुत्र राजकन्येहून मोठा असल्यामुळें वयांत आल्यावर राजयन्येनें आपल्याला वरावें अशी त्यानें आशा धरिली. पुढें कांहीं दिवसांनीं त्यानें आपला मनोदय उघडपणें राजकन्येस कळविला. पण त्या प्रधानपुत्राचें भाषण

राजकन्येस रुचलें नाहीं. तिनें त्याला स्पष्ट सांगितलें कीं, " तूं माझ्या बापाच्या सेवकाचा पुत्र, अर्थात् माझा सेवक आहेस. मी राजकन्या असल्यामुळें राजकुलांतील पुरुषाबरोबरच मी लग्न करीन तरी पुनः ही गोष्ट माझ्याजवळ बोलून आपला उपमर्द करून घेऊं नकोस ! " हें राजकन्येचें भाषण ऐकतांच प्रधानपुत्र तिला म्हणाला, " राजकन्ये ! तुझें राजपुत्राबरोबर लग्न होईल; पण तो मूढ व अप्रबुद्ध मिळेल एवढें लक्षांत ठेव ! " तें ऐकून राजकन्या म्हणाली, " माझ्या दैवीं जसा पति असेल तसा मला मिळेल; पण मी तुला वरणार नाहीं ! " याप्रमाणें त्या राजकन्येनें स्पष्ट सांगतांच प्रधानपुत्र निराश झाला. कोणत्याही उपायानें राजकन्येचा एका मूर्ख पुरुषाबरोबर विवाह करून द्यावयाचा असा त्या प्रधानपुत्रानें आपल्या मनाशीं निर्धार करून ठेवला. पुढें दोघांनीं आपापला विद्याभ्यास पूर्ण केला. तेव्हांपासून राजकन्या व प्रधानपुत्र यांची गांठही पडेनाशी झाली.

कांहीं दिवसांनीं आपली कन्या उपवर झाली आहे असें पाहून राजानें आपल्या प्रधानास, कन्येसाठीं उत्तम वर शोधून आणण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें प्रधान प्रवासास निघण्याची तयारी करूं लागला. ही बातमी प्रधानपुत्रास कळतांच त्यानें बापाजवळ येऊन सांगितलें, " बाबा, सांप्रत आपला वृद्धापकाळ झालेला आहे, यास्तव आपण जर मला आज्ञा कराल तर मी राजकन्यकरितां योग्य वर शोधून आणीन. त्याबद्दल आपण मुळींच काळजी करूं नये. तिचा व माझा विद्याभ्यास एकत्र झालेला असल्याकारणानें लहानपणापासून तिचा व माझा लोभ आहे व तिच्या मनासारखा

पति मीच शोधून आणूं शकेन !" याप्रमाणें पुत्राचें भाषण ऐकतांच प्रधानास आनंद झाला व त्यानें ती गोष्ट राजास कळवून त्याच्या संमतीनें राजकन्येसाठीं वर शोधून आणावयास पुत्रास पाठवून दिलें. हा प्रकार राजकन्येस मुळींच माहीत नव्हता.

प्रधानपुत्र बापाची आज्ञा घेऊन निघाला व देशोदेशीं मूर्ख राजपुत्राचा शोध करूं लागला. पण त्याला सांपडेना. शेवटीं त्यानें राजपुत्राचा नाद सोडला आणि कोणत्याही जातीचा मुलगा तो पाहूं लागला. कांहीं दिवसांनीं त्याला त्याच्या इच्छेसारखा एक गुरें राखणारा तरुण मुलगा आढळला. त्याचा प्रकार असा झाला कीं, एके दिवशीं प्रधानपुत्र एका अरण्यांतून चालला असतां, एक सोळा-सतरा वर्षांचा तरुण व रूपसंपन्न मुलगा एका मोठ्या वृक्षावर चढून एका फांदीवर बसलेला व त्याच फांदीला मागें स्वतःच तोडीत असलेला दिसला. त्याचें तें उलटें व विलक्षण कर्म पाहतांच प्रधानपुत्रास आश्चर्य वाटलें व त्यानें त्या मुलास हांक मारून विचारलें, " अरे बाबा, तूं हें काय करीत आहेस ? तूं तोडीत आहेस ती फांदी जर तुटली तर तूं खालीं पडशील, याचा विचार तुला कसा नाहीं ? " तें बोलणें ऐकतांच तो म्हणाला, " अहो महाराज ! मी तर मुद्दाम पडण्यासाठीं हें करीत आहें. या फांदीवर मी सहज चढलों, पण आतां खालीं उतरवत नाहीं; माझीं गुरें लांब निघून गेलीं, म्हणून ही युक्ति काढली. फांदी तुटली म्हणजे सहजच मी खालीं पडेन आणि मग धांवत जाऊन आपलीं ढोरें आवरीन ! " याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून व त्याच्या चेहऱ्या-मोहऱ्याची ठेवण पाहून प्रधानपुत्रानें हा खरोखर मूर्ख आहे असें

जाणलें आणि आपल्या जवळच्या सेवकांस सांगून त्या मुलास त्यानें खालीं उतरविलें व त्याच्या इच्छेप्रमाणें प्रथम त्याचीं गुरें धरून आणविलीं व त्याच्याबरोर घरीं जाऊन त्याच्या बापाची भेट घेतली. तेव्हां त्याला कळलें कीं, हा ब्राह्मणाचा पुत्र असून मूढपणामुळें आईबापांचा नावडता आहे. नंतर प्रधानपुत्रानें त्याला त्याच्या आईबापांजवळून मागून घेतलें आणि त्याला राजपुत्रा-प्रमाणें वागण्यास शिकवलें. त्याच्यासाठीं नवीं चाकरमाणसें ठेविलीं व हा 'ब्रह्मदेशांतील राजपुत्र आहे' असें त्यांना म्हणा-वयास शिकविलें. नंतर त्याला घेऊन तो प्रधानपुत्र आपल्या नगरास आला व बापास भेटून 'हा ब्रह्मदेशांतील राजपुत्र आहे, असें त्यास सांगितलें. प्रधानानें तें राजास कळविलें आणि भावी जामाताची व त्याची भेठ करविली. जामाताचें उत्तम स्वरूप पाहून राजास आनंद झाला आणि त्यानें कन्येच्या लग्नाची तयारी करून एका सुमुहूर्तावर त्याचें लग्न लाविलें. पुढें रात्रौ जेव्हां त्याला राजकन्येच्या महालांत पाठविलें, तेव्हां तेथें तो एकटाच असल्यामुळें गांगरला आणि 'आतां कसें करावें?' म्हणून विचारांत पडला. सगळा दिवस लग्नाच्या गडबडींत गेल्यामुळें त्याला निद्रा तर फारच येत होती. मूळचा तो गरीब ब्राह्मणाचा अज्ञान मुलगा असल्यानें तेथील ऐश्वर्य पाहून तो घाबरला आणि तेथें जी उत्तम प्रकारची शय्या तयार करून ठेविली होती, तिच्यावर न निजतां तो एका कोपऱ्यांत जाऊन डोक्याचा मंदील उशाखालीं ठेवून आनंदानें घोरत पडला. पलंगावर निजल्यास कोणी रागें भरेल, हा विचार त्याच्या मनांत उद्भवला होता. त्याला झोप लागतांक्षणीं तो इतक्या मोठ्यानें घोरूं लागला कीं, तें ऐकूनच भीती वाटली असती.

नंतर हातांत पंचारती घेऊन; वस्त्रालंकारांनीं मंडित राजकन्या त्या ठिकाणीं आली. मंदिरांत जातांना नाना प्रकारचे विलास भोगण्याचे विचार तिच्या मनांत घोळत होते. ती नखऱ्यानें ठुमकत ठुमकत मंदिरांत येऊन चोहोंकडे पाहूं लागली; पण त्या ठिकाणीं तिचा पति तिला दिसेना, तेव्हां ती विचारांत पडली. पलंगावर तयार केलेली शेज जशीच्या तशीच होती म्हणून तिनें आपल्या हातांतील पंचारती खालीं ठेवली आणि लक्षपूर्वक चोहोंकडें ती पतीचा शोध करूं लागली. तेव्हां तिला तो कोपऱ्यांत निजलेला आढळला. त्या वेळचें त्याचें घोरणें ऐकतां-क्षणीं ती चपापली. थोडें बारकाईनें पाहिल्यावर तो पुरुष महा-मूर्ख आहे असें तिच्या ध्यानांत आलें व लहानपणीं गुरुगृहीं असतां प्रधानपुत्रानें जी प्रतिज्ञा केली होती ती अक्षरशः तिला स्मरली. मग काय विचारावें ! तिची अत्यंत निराशा झाली व जन्माचें मातेरें झालें असें तिच्या मनांत आलें. नंतर कांहीं वेळ त्याच स्थितींत लोटल्यावर याची जात तरी कोणती आहे याचा शोध करण्याचें तिच्या मनांत आलें. म्हणून त्याला जागृत करण्यासाठीं पहिल्यानें तिनें श्रीमंती नाजूक उपचार आरंभिले; पण तो ब्राह्मणपुत्र जागा होईना. शेवटीं जेव्हां तिनें त्याच्या अंगावरील शेला ओढला तेव्हां तो जागा झाला व राजकन्येला पाहतांच भयानें थरथर कांपूं लागला. तिनें त्याची तशी स्थिति पाहतांच त्याला अभय दिलें आणि त्याचें इतिवृत्त कळावें, अशा हेतूनें त्याला अनेक प्रकारचे प्रश्नही केले; पण त्यांतील एकाही प्रश्नाचें उत्तर त्यानें दिलें नाहीं. शेवटीं त्याच्या मनाला निर्भयपणा

वाटावा म्हणून ती राजकन्या त्याच्याजवळ गोडीगुलाबीनें बोलतां बोलतां त्या मंदिरांतील भिंतीवरील नाना प्रकारचीं चित्रें त्यास दाखवूं लागली. चित्रविचित्र अशा छप्पन्न देशांतील राजांच्या सभा, ऋषींचीं स्थानें, इंद्रचंद्रादिक लोकपालांचा दिव्यलोक आणि पातालस्थ उरग, पन्नग इत्यादिकांचे समुदाय तिनें त्याला दाखवून त्या प्रत्येकाबद्दलची माहितीसुद्धां सांगितली. तरी त्याचें मन कांहीं तेथें लागेना आणि आपला पति कोणत्या जातीचा आहे हें राजकन्येच्या ध्यानांत येईना. ती अगदीं निराश होत चालली. शेवटीं जेव्हां ती दहा अवतारांचीं चित्रें त्याला दाखवूं लागली, तेव्हां त्यांतील श्रीकृष्णाची बालक्रीडा काढलेलीं चित्रें पाहून तो आनंदानें उड्या मारूं लागला. तो प्रकार पाहतांच ' आपला पति गुरें चाराणारा गोवारी आहे ' असें ती समजली. त्यामुळें तिच्या मनाला खिन्नता उत्पन्न झाली व शेवटीं अत्यंत क्रोध येऊन ती राजकन्या त्या बिचाऱ्याचा जीव घेण्यास तयार झाली. तेव्हां सगळी खरी हकीगत कबूल करून आपली सुटका करून द्यावी अशा हतूनें तो तिची प्रार्थना करूं लागला. त्यांत, मी गरीब ब्राह्मणाचा पुत्र आहें, असें त्याच्या तोंडांतून आलें. तेव्हां तिनें त्याचा जीव घेण्याचा जो संकल्प केला होता तो फिरविला आणि पुन्हां या शहरांत येऊन लोकांच्या दृष्टीस पडूं नको अशी ताकीद करून त्याच्या कंबरेला दोरी बांधून तिनें आपल्या मंदिराच्या मागच्या बाजूनें त्याला खालीं सोडून दिलें.

आपलें लग्न होऊन आपल्या मूर्खपणाबद्दल आपली बायकोच आपला जीव घेत होती ह्याची जाणीव होतांच त्याला फार वाईट

वाटून तो ब्राह्मणपुत्र काळोखांतून विचार करीत चालला. नंतर शहराबाहेर एक देवीचें देवालय होतें, त्या ठिकाणीं आल्यावर तो सहज त्या देवळांत शिरला. तेथें त्यास देवीचें दर्शन झालें आणि त्याचबरोबर त्याच्या दैवाचाहि उदय झाला. जरी तो मूर्ख होता, तरी आपला अपमान झाला ह्याची जाणीव होऊन देवीच्या समोर येतांच त्यानें देवीला नमस्कार घातला आणि त्याला अशी उत्कट इच्छा उत्पन्न झाली कीं, देवीनें प्रसन्न होऊन आपणांस बुद्धिरूप वैभव अर्पण करावें. बुद्धि प्राप्त होण्याबद्दल त्याला इतकी उत्कट इच्छा उत्पन्न झाली कीं, आपली जीभ ओढून जीव देण्याचा प्रयत्न तो करूं लागला. तो आपला प्राण खचित देणार असें त्या आदिमायेला वाटलें, तेव्हां ती प्रत्यक्ष त्या ठिकाणीं प्रगट झाली आणि त्याला म्हणाली कीं, ' तूं व्यर्थ प्राण देऊं नको ! माझ्या वरप्रसादें करून आजपासून तूं जें बोलशील तें खरें होईल आणि माझ्या प्रसादेंकरून तूं कालिदास या नांवानें जगांत प्रख्याती पावशील. धारानगरींत राजा भोज महापुण्यशील व प्रतापी राजा राज्य करीत आहे. त्याच्या आश्रयाला जाऊन रहा, म्हणजे सर्व प्रकारें करून तुझें कल्याण होईल आणि सर्व विद्या तुला करतलामलवत् होतील ! " याप्रमाणें वर देऊन देवी अंतर्धान पावतांच तो महाविद्वान् झालेला ब्राह्मणपुत्र तेथेंच देवीच्या पुढें बसून त्या आदिमायेची स्तुति व स्तोत्रें गायन करूं लागला.

इतक्यांत ज्या राजकन्येनें त्याला मंदिरांतून खालीं सोडून दिलें होतें, ती आपल्या नित्यनियमाप्रमाणें मध्यरात्र उलटून गेल्यावर एका दासीसहवर्तमान पूजासाहित्य हातांत घेऊन त्याच देवीचें

पूजन करण्यासाठीं देवालयांत आली. तेथें एक पुरुष देवालयांत बसून गंधर्वाप्रमाणें गायन करीत आहे असें पाहून ती कांहीं वेळपर्यंत दाराशीं उभी राहिली. त्याचें गायन ऐकून तिला फारच आनंद झाला. शेवटीं त्यानें गायन बंद करून एका बाजूस व्हावें अशा उद्देशानें तिनें आपल्या दासीस पुढें पाठविलें. तेव्हां देवीच्या प्रसादानें त्याच्या सर्व प्रकार लक्षांत येऊन तो म्हणाला, "ज्या स्त्रीचें माझ्याबरोबर लग्न लागलें आहे तीच मला लाजते आणि जगन्मातेचें दर्शन घेण्याचें सोडून आड उभी राहते, हें आश्चर्य नव्हे काय?" हे शब्द ऐकतांच त्या राजकन्येला वाटलें कीं, हा माझा पति महाविद्वान असून माझी परीक्षा पहाण्यासाठीं मूर्खत्व पत्करून माझ्या मंदिरांत असतांना त्याप्रमाणें वागला. तरी आपण त्याला शरण जावें आणि सर्व अपराधांबद्दल क्षमा मागून त्याला मंदिरांत न्यावें.' असें मनांत येतांच ती त्याचे पाय धरून क्षमा मागूं लागली, तेव्हां कालिदास म्हणाला, "राजकन्ये! तूं माझा कोणताही अपराध केलेला नाहींस. फार काय सांगावें? आज तूं मला गुरुप्रमाणें पूज्य व वंदनीय आहेस. यासाठीं मनांतील सर्व विषाद सोडून आपल्या नित्यनियमाप्रमाणें देवीचें पूजन करून आपल्या मंदिरांत जा!" हें त्याचें भाषण ऐकून ती फारच खिन्न झाली आणि त्यानें मंदिरांत परत यावें, अशा हेतूनें अनेक प्रकारें ती त्याचें आर्जव करूं लागली. पण तें त्यानें मुळींच मान्य केलें नाहीं. उलट "देवीचा वरप्रसाद होण्याला कारण तूंच आहेस" असें बोलून त्यानें तिला नमस्कार केला आणि भोजराजाची भेट घेण्याच्या उद्देशानें त्याच वेळेस धारा नगरीचा मार्ग धरून तो चालता झाला.

धारानगरींत भोजराजा विद्वानांस चांगल्या प्रकारें आश्रय देत असे. त्याची कीर्ति ऐकून देशोदेशींचे विद्वान्, पंडित आणि कवि त्याच्या आश्रयास येऊन राहिले होते; परंतु कालिदास तेथें गेल्यावर त्याची विद्वत्ता पाहून तो लवकरच राजाच्या प्रीतींतील पंडित झाला. त्या राजाच्या आश्रयास सदोदित नऊशें पंडित असत. त्या सर्वांत कालिदासाचा मान मोठा असे. राजाच्या बिकट समस्या पूर्ण करणें व त्याच्या मनांतील गोष्ट उघड करून सांगणें हें काम कालिदासावांचून इतरांस मुळींच साधत नसे. राजाच्या समस्या कालिदास कशा पूर्ण करीत होता, हें पुढील गोष्टी वाचून लक्षांत येईल.



# गोष्ट १ ली

## पंचारतीच्या आवाजानें राजास सुचलेली समस्या

एके दिवशीं रात्रीं भोजराजा आपल्या शयनमंदिरांत जाऊन आनंदानें आपल्या प्रियपत्नीची मार्गप्रतीक्षा करीत बसला होता. त्याची स्त्री घाईनें पंचारती तयार करून ती हातांत घेऊन मंदिरांत येण्यासाठीं जिन्याच्या पायऱ्या चढूं लागली. पतीच्या दर्शनाची उत्सुकता आणि 'तेथें गेल्यावर आज अमुक प्रकारानें पतीबरोबर हास्यविनोदादिक क्रीडा करीन' असे विचार तिच्या मनांत घोळत असल्याकारणानें ती जिना चढत असतां तिची एक पायरी चुकली आणि हातांतील पंचारती सुटली व ती थाड थाड आपटत सगळ्या पायऱ्यांच्या खालीं घरंगळत जाऊन स्थिर झाली. राजानें तो ध्वनि ऐकतांक्षणीं श्लोकाचा एक चरण समस्येदाखल तयार केला

आणि दुसऱ्या दिवशीं सभेंत गेल्यावर ती समस्या पंडितांच्या पुढें मांडावयाची असें त्यानें मनांत ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं नियमाप्रमाणें सभेंत जाऊन बसल्यावर जेव्हां एकेक पंडित राजदर्शनासाठीं येऊं लागला. तेव्हां त्या प्रत्येकापुढें त्यानें 'ठाठं ठठंठं ठठठं ठठंठः' ही समस्या म्हणून दाखविण्याचा क्रम चालविला; परंतु एकाही पंडिताला ती पुरी करतां येईना. शेवटीं कालिदास सभेंत येऊन नित्य नियमाप्रमाणें राजास आशीर्वाद देऊन उभा राहतांच राजानें तो चरण उच्चारला. तो ऐकतांच कालिदास देवीच्या प्रसादानें ती समस्या पूर्ण करण्याच्या उद्देशानें म्हणाला,

भोजस्य भार्या मदविव्हलाया ॥
कराच्च्युतं चंदनहेमपात्रम् ॥
सोपानमार्गे प्रकरोति शब्दम् ॥
ठाठं ठठंठं ठठठं ठठंठः ॥ १ ॥

**अर्थ**—भोजराजाची पत्नी कामविव्हल होऊन हातांत चंदनयुक्त सुवर्णाची पंचारती घेऊन जात असतां जिन्यांत पायरी चुकून तिच्या हातांतील पंचारती पडली व जिन्याच्या पायऱ्यावरून गडगडत खाली येतांना, टा ठण् ठण् ठण् ठण् असा आवाज झाला.

याप्रमाणें समस्या पूर्ण होतांच राजास अत्यानंद झाला. त्यानें कालिदासाला उत्तम प्रकारचें बक्षीस दिलें व त्याची तारीफ केली.



# गोष्ट २ री

## सिंदूरतिलकाचें आश्चर्य

एके दिवशीं तिसऱ्या प्रहराच्या सुमारास भोजराजा आपल्या माडीवर बसून मार्गावरील मौज पाहात असतां एक विधवा स्त्री आपल्या कपाळीं सिंदूरतिलक लावून येत असलेली त्याच्या दृष्टीस पडली आणि त्याला त्या विलक्षण प्रकाराबद्दल आश्चर्यही वाटलें. हा काय प्रकार आहे,, हें पंडितांस विचारावें, असें मनांत आणून जो प्रकार पाहिला होता, त्याबद्दल श्लोकाचा एक चरण त्यानें तयार केला आणि दुसऱ्या दिवशीं सभेंत जाऊन बसल्यावर प्रत्येक पंडित येऊन आशीर्वाद देऊन उभा राहिला म्हणजे 'सिंदूरबिंदुर्विधवाललाटे' हा चरण तो उच्चारूं लागला; परंतु कोणीही पंडित त्याचें उत्तर देईना. शेवटीं कालिदास सभेंत आल्यावर त्यालाही राजानें आपल्या श्लोकाचा चरण म्हणून दाखविला; तेव्हां देवीच्या वरदानेंकरून त्रिकालज्ञ झालेला तो कालिदास हास्यवदन करून राजास म्हणाला,

नमीत होती विधवा शिवाला ॥
मसूरडाळी जडली कपाळा ॥
तें पाहूनीं विस्मय फार वाटे ॥
सिंदूरबिंदुर्विधवाललाटे ॥ १ ॥

याप्रमाणें कालिदासानें समस्या पूर्ण करितांच राजास फार आनंद झाला आणि त्यानें कासिदासास वस्त्रें व अलंकार देऊन गौरविलें.



# गोष्ट ३ री

## चुलींतील भाकरीवरील समस्या

एके रात्रीं भोजराजा आपला एक हुजऱ्या बरोबर घेऊन गुप्त वेषानें नगरचर्या पाहण्यासाठीं निघाला असतां, फिरत फिरत एका गरीब मनुष्याच्या घराजवळ गेला. तेथें त्या शेतकऱ्याची नवयौवना स्त्री आपल्या हातावर भाकऱ्या करून तव्यावर टाकीत होती व तेथें अर्धकच्च्या तयार झाल्या म्हणजे चुलींत घालून चांगल्या भाजीत होती. तो प्रकार राजा फटींतून पाहात असतांना त्या वर्तुळाकार आणि पांढऱ्या शुभ्र भाकऱ्या पाहून राजास चंद्राची आठवण झाली व पंडितांना विनोद करण्यासाठीं त्यानें श्लोकाचा एक चरण तयार केला आणि आपल्या मंदिराचा मार्ग धरिला. दुसऱ्या दिवशीं जेव्हां पंडित राजदर्शनासाठीं सभेंत येऊं लागले, तेव्हां त्या प्रत्येकास 'आकाशिंचा चंद्र चुलींत गेला' हा श्लोकाचा चौथा चरण म्हणून दाखवूं लागला. पण तो ऐकतांच प्रत्येक पंडित निरुत्तर होऊन विचार करीत आपल्या जागेवर जाऊन बसत असे. शेवटीं कालिदासानें जेव्हां तो श्लोकाचा चौथा चरण ऐकला तेव्हां तो शंका दूर करीत म्हणाला,

चंद्रानना फुंकित पावकाला ॥
आश्चर्य वाटे कविच्या मनाला ॥
अहो समाचार विचित्र झाला ॥
आकाशिंचा चंद्र चुलींत गेला ॥ १ ॥

**अर्थ**--चंद्रमुखी स्त्री चुलीमध्यें जाळ करतांना पाहून कवीच्या मनाला आश्चर्य वाटलेंच; पण तव्यावरची ( पांढरी शुभ्र ) भाकरी ( भाजण्याकरितां चुलींत उभी करतांच चन्द्र चुलींत गेल्याची कल्पना त्यास झाली.

याप्रमाणें कालिदासानें दिलेलें उत्तर ऐकतांच राजाच्या मनाला अतिशय आनंद झाला व उत्तरोत्तर कालिदासाची कीर्ति वृद्धिंगत झाली.



## गोष्ट ४ थी

### कालिदासानें धनंजय पंडिताची केलेली फजिती

काकिदासाच्या समयोचित उत्तरांमुळें भोजराजा अत्यंत आनंदित होत चालल्याकारणानें धारानगरींत कालिदासाहून श्रेष्ठ पंडित कोणीही नाहीं, असें सर्वतोमुखीं होऊं लागलें. त्यामुळें त्या धारानगरींतच राजाच्या आश्रयानें निर्वाह करणारा जो धनंजय नांवाचा कवि होता त्याच्या अंगाची आग होत चालली. तो उघड रीतीनें कालिदासाची स्पर्धा करूं लागला. एके दिवशीं त्या धनंजय कवीनें कालिदासाची अप्रतिष्ठा राजाच्या मनांत भरवून देण्यासाठीं एक श्लोक तयार करून तो एका कागदावर लिहिला व तो कागद आपल्या एका शिष्याच्या हातांत देऊन त्याला राजाकडे पाठविलें. तो श्लोक असाः—

अपशब्दशतं माघे भारते च शतत्रयम् ॥
कालिदासो न गण्यन्ते कविरेको धनंजयः ॥ १ ॥

**अर्थ**—माघकाव्यांत शंभर, भारतांत तीनशें आणि कालिदासाच्या काव्यांत किती अपशब्द आहेत यांची गणतीच नाहीं. धनंजय कवीला मात्र ( हें दर्शविण्याकरितां ) एकदांच अपशब्द लिहावा लागला.

धनंजयानें दिलेला हा श्लोक राजाकडे घेऊन जात असतां त्या शिष्यची व कालिदासाची मार्गांत भेट झाली. आपला गुरु कालिदासाचा द्रोह करितो, हें त्या शिष्याला ठाऊक नव्हतें.

त्यामुळें कालिदास दृष्टीस पडतांच त्या शिष्यानें तो श्लोक कालिदासाला दाखविला व हा माझ्या गुरूनें राजाजवळ देण्यास दिला आहे, असें त्याला सांगितलें. कालिदासानें तो श्लोक वाचतांच त्यांत आपली उघड निंदा केलेली पाहून तो त्या शिष्याला म्हणाला, “ तुझ्या गुरूनें श्लोक फार चांगला केला आहे; पण लिहीत असतांना त्याच्या हातानें एक काना चुकला आहे तो जर तूं देशील तर तुझ्या गुरूची कीर्ति होईल ! ”

याप्रमाणें भाषण ऐकतांच तो शिष्य म्हणाला, “ महाराज, तो काना कोणत्या ठिकाणीं राहिला आहे मला कळत नाहीं ! कृपा करून आपणच तो द्यावा म्हणजे मजवर व माझ्या गुरूवर आपले उपकार होतील. ” तें ऐकतांच कालिदासानें तो कागद घेतला व त्यावरील श्लोकाच्या पहिल्याच अक्षराला काना दिला आणि त्या शिष्याला तो श्लोक राजाजवळ देण्यास सांगितलें. जेव्हां तो श्लोक राजानें वाचला तेव्हां त्याला त्याचें आश्चर्य वाटलें व धनंजय कवीचा उपहास करण्यासाठीं तो श्लोक आपल्या सभेंतील सर्व पंडितांस दाखविला. तेव्हां प्रत्येक पंडित धनंजयाकडे पाहून हसूं लागला. शिष्याला पुढें पाठवून काय होतें तें पाहण्यासाठीं स्वतः धनंजयही राजसभेंत जाऊन बसला होता. जेव्हां सर्व पंडित आपल्याकडे पाहून हसताहेत असें त्याला दिसलें तेव्हां राजाजवळ दिलेला कागद युक्तीनें त्यानें एका पंडिताच्या हातांतून घेतला आणि वाचला. तेव्हां,

आपशब्दं शतं माघे भारते च शतत्रयम् ॥
कालिदासो न गण्यंते कविरेको धनंजयः ॥ १ ॥

( अप ह्या शब्दांतील अ अक्षराला एक काना अधिक दिल्यामुळें सगळ्या श्लोकाचा अर्थ फिरला. ) माघकाव्यांत आप म्हणजे पाणीवाचक शब्द शंभरर आहेत; भारतांत तीनशें आहेत; पण कालिदासाच्या काव्यांत किती आहेत याचें गणितच नाहीं. धनंजय कवि मात्र ' आप ' एवढाच पाण्याचा शब्द जाणतो ! )

याप्रमाणें आपल्या हातानेंच आपण आपली फजिती करून घेतली, असें मनांत आणून धनंजय कवि कांहींही न बोलतां खिन्नवदन करून निघून गेला.



# गोष्ट ५ वी

## कालिदासाच्या दासींचें चातुर्य

वारंवार भोजराजाकडून मान मिळत चालल्याकारणानें कालिदासाची मान्यता वाढली आणि त्याची कीर्ति चोहींकडे पसरली. एकदां दूर देशांतून एक विद्वान पंडित कालिदासाला जिंकण्याच्या हेतूनें निघाला आणि हळूहळू मार्गक्रमण करीत एके सायंकाळीं धारानगरीच्या बाहेर एक बाग होता त्या बागेंत येऊन उतरला. तेथें कालिदासाबद्दल कांहीं माहिती मिळवावी असें मनांत आणून तो बागेंतील एका चबुतऱ्यावर जाऊन बसला. इतक्यांत कालिदासाच्या घरच्या दोन बटकी त्या बागेंत येऊन फुलें वेंचूं लागल्या. त्या दृष्टीस पडतांच कालिदासाची माहिती विचारण्याकरितां त्यांतील जी स्त्री त्याच्याजवळच्या ताटव्याचीं फुलें काढीत होती तिला तो म्हणाला, " बाई, तूं कोण आहेस ? " हा प्रश्न ऐकतांच त्या बटकीनें त्याच्याकडे पाहून पुढें लिहिलेल्या श्लोकांत त्याला उत्तर दिलें:—

चतुर्मुखो न च ब्रह्मा वृषारूढो न शंकरः ॥
अकाले वर्षते मेघस्तस्याहं कुलबालिका ॥ १ ॥

**अर्थ**—चार मुखें आहेत परंतु ब्रह्मदेव नव्हे, बैलावर बसणारा परंतु महादेव नव्हे; ज्याच्या योगानें अकालीं मेघांचा वर्षाव होतो अशाच्या कुलांतील मी एक कन्या आहें.

याप्रमाणें चमत्कारिक उत्तर ऐकतांच तो पंडित चकित झाला, आणि बराच वेळ विचार केल्यावर बैलावरून पखाल वहाणाराची ही मुलगी असावी असें तो आपल्या मनांत समजला. इतक्यांत दुसरी बटीक फुलें वेंचीत त्याच्याजवळ आली. तेव्हां तिलाही तूं कोणाची आहेस असें त्यानें विचारलें. तेव्हां तिनेंही त्याला श्लोकरूपानें उत्तर दिलें. ती म्हणाली:—

कृष्णमुखी नच वानरी द्विजिव्हा नच सर्पिणी ॥
पंचप्रिया न पांचाली तस्याहं कुलबालिका ॥ १ ॥

**अर्थ**—काळया तोंडाची आहे; परंतु वानरी नव्हे, दोन जिभा आहेत, पण सर्पिणी नव्हे; त्याचप्रमाणें पांच भ्रतार आहेत, परंतु पांचली ( द्रौपदी ) नव्हे, अशांच्या कुळांतील मी कन्या आहें.

याप्रमाणें चमत्कारिक उत्तर ऐकतांच त्या पंडिताला पुन्हा आश्चर्य वाटलें. मग पुष्कळ विचार केल्यावर ती कारकूनाची मुलगी असावी, असें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें. नंतर तो त्या दोघींस म्हणाला, "बायांनो, तुम्हीं बऱ्याच चतुर दिसतां, त्यावरून तुम्हांस कालिदासाची माहिती असेलच. तरी त्याची माहिती मला सांगितल्यास मजवर तुमचे उपकार होतील." असें ऐकतांच त्या दोघीही म्हणाल्या, "आम्हीं कालिदासाच्या घरांतील बटकीआहोंत. आपणांस जी माहिती पाहिजे असेल ती विचारा म्हणजे सांगतों." तेव्हां त्या पंडितानें मनांत विचार केला कीं, 'ज्या कालिदासाच्या घरांतील बटकी इतक्या चतुर आहेत, त्याला जिंकणें दुरापास्त आहे; तरी आतां त्याच्याशीं सख्य करावें हें योग्य होय.' ह्याप्रमाणें विचार करून तो त्या बायांबरोबरच कालिदासाच्या घरीं गेला व त्याच्याशीं सख्य करून त्यानें लाभ करून घेतला.



## गोष्ट ६ वी

### विपरीत समस्येसही समर्पक उत्तर

कालिदासाशीं मनांतून स्पर्धा बाळगणारे पंडित धारानगरींत पुष्कळच होते; परंतु भोजराजाच्या सभेंत महाविद्वान् असे नऊ हजार पंडित असले तरी पण वेळेवर समयोचित उत्तर देणारा आणि मोठमोठ्या बिकट आणि कठीण समस्या पूर्ण करणारा फक्त कालिदासच होता; त्यामुळें राजाला तो मनापासून आवडत असे. त्याचा एकदां तरी पाडाव करावा हा उद्देश मनांत धरून एका पंडितानें राजाची एकांतीं भेट घेतली आणि राजाला एक बिकट समस्या सुचविली आणि सांगितलें, "आमची ही समस्या जर कालिदास पूर्ण करील तर आम्ही उघड रीतीनें त्याचें श्रेष्ठत्व कबूल करूं." ती समस्या अशी होतीः—'कुंतीसुतो रावणकुंभकर्णाः।' ही समस्या खरोखर कठीण आहे असें राजासही वाटलें. तरी पण कालिदासाची परीक्षा पहाण्याकरितां राजानें दुसऱ्या दिवशीं कालिदास सभेंत येतांच ती समस्या त्याला घातली. या समस्येचा अर्थ असा कीं, 'रावण व कुंभकर्ण हे कुंतीचे पुत्र.' पुराणांत कुंतीचे पुत्र धर्मभीमादि पांडव हें जगप्रसिद्ध असतां रावण, कुंभकर्ण व कुंती यांचा संबंध काय आणि कालिदास झाला तरी याचें समर्पक उत्तर कसें देऊं शकणार, या विचारानें राजा उत्सुकतेनें बसला असतां कालिदासानें तावडतोब उत्तर दिलें,

का पाण्डुपत्नी गृहभूषणं किं ॥
को रामशत्रुः किमगस्त्यजन्म ॥
कः सूर्यपुत्रो विपरीतपृच्छा ।
कुंतीसुतो रावणकुंभकर्णः ॥ १ ॥

**अर्थ**—पंडुराजाची पत्नी ( स्त्री ) कोणती ? कुंती; गृहांत ( घरांत ) भूषण काय ? सुत अर्थात् मुलगा, रामाचा शत्रु कोण ? रावण; अगस्त्यऋषींचें जन्मस्थान कोणतें ? कुंभ. ( अगस्त्यऋषि मातीच्या घागरींत जन्मला अशी कथा आहे. ) सूर्याचा पुत्र कोण ? कर्ण; विपरीत बोलणें कोणतें ? रावण कुंभकर्ण हे कुंतीचे पुत्र असें बोलणें विपरीत होय.

याप्रमाणें राजानें जी समस्या घातली होती, त्या समस्येंतील हरएक शब्द उत्तरादाखल योजून पहिले तीन चरण त्यानें तयार केले आणि समस्या पुरी केली. हें पाहतांच राजाला अत्यानंद झाला; पण समस्या घालणाऱ्या पंडिताला आपला प्रयत्न फुकट गेला व त्यामुळें कालिदासाची मान्यता अधिक वाढली असें पाहून वाईट वाटलें आणि अधोवदनानें तो घरीं निघून गेला.



## गोष्ट ७ वी

### कालिदासाचें निर्भीड उत्तर

भोजराजाच्या प्रीतींतील एक नायकीण धारानगरींत राहात होती. तिनें कालिदासाच्या समयसूचकतेबद्दलची कीर्ति ऐकून कालिदासाची भेट घेण्याचें मनांत आणिलें. कालिदास विद्वान् होता, त्याप्रमाणेंच तरुण, रूपवान् आणि शृंगारचतुरही होता. त्यामुळें त्या नायकिणीची अगदींच अल्प प्रयत्नांत भेट झाली. पुढें त्या दोघांत असें प्रेम वाढलें कीं, एकमेकांस पाहिल्यावांचून एक क्षणभरही दोघांस चैन पडत नसे. प्रत्यक्ष राजा तिला चहात असतां ती कालिदासावर फिदा झाली असें पाहून तिचीं वडील माणसें तिला वारंवार टोंचून बोलूं लागलीं. त्याचप्रमाणें कालिदासाचें तिच्या घरचें जाणेंयेणेंही फार दिवस झांकून राहिलें नाहीं. कालिदासाच्या

हितकर्त्यांच्या तें ध्यानांत येण्यपूर्वी त्याच्या शत्रूंनीं ओळखलें व ह्या गोष्टीचा फायदा घेऊन ते त्याचा कांटा काढण्याचा विचार करूं लागले. कालिदासाचे जे हितकर्ते होते, त्यांनीं कालिदासास या गोष्टीपासून परावृत्त करण्याची शिकस्त केली; पण प्रीति आंधळी आहे ही म्हणच शेवटीं खरी झाली आणि ती नायकीण व कालिदास हीं दोघेंत एकमेकांवर उघड प्रेम करूं लागलीं. त्यामुळें पुढें कालिदासाचें राजसभेंत जाणेंही नियमित होईना.

शेवटीं कालिदासाचे प्रतिस्पर्धी यांनीं ती गोष्ट राजाच्या कानापर्यंत पोंचविली. पण भोजराजा सुविचारी होता. त्यानें विचार केला कीं, जी पण्यांगना [ बाजारांत बसणारी ] आहे, तिला पतिव्रतेप्रमाणें वाळगण्याची इच्छा करणारे खरोखर महामूर्ख होत, आतां कालिदास तिच्या घरीं सारखा पडून राहतो म्हणून त्याला एक वेळ तेथें धरून त्याची चांगली फजिती मात्र करावी म्हणजे झालें, असे मनांत आणून राजानें एके दिवशीं त्या नायकिणीला सांगितलें कीं, ‘ आज मी आपल्या महालांत निघून गेल्यावर कालिदास तुझ्याकडे येईलच; तरी तो आला म्हणजे दार न उघडतां त्याला असे सांग कीं, तुमची मजवर खरोखर प्रीति असेल, तर या रात्रीच्या समयीं तुम्हीं हजामत करून यावें म्हणजे मी दार उघडीन. एवढें काम जर तूं करशील तर तुला चांगलें बक्षीस देईन ! ’

नायकिणीनें तें कबूल केल्यावर राजा आपल्या महालांत निघून गेला. कांहीं वेळानें कालिदास त्या नायकिणीकडे येऊन दार उघडण्यास सांगूं लागला. तेव्हां राजाच्या इच्छेप्रमाणें नायकिणीनें

ांगितलें. तें ऐकतांच कालिदास तडक एका न्हाव्याकडे गेला प्राणि हजामत करवून नायकिणीकडे आला, तेव्हां तिनें त्याला ार उघडून घरांत घेतलें. नंतर कालिदास परत जाऊं लागला ेव्हां तो नायकिणीला म्हणाला, 'तुझ्या प्रीतीस्तव मी आज ात्रौ श्मश्रू करविलीं, तरी आतां माझ्यासाठीं तूं असें कर कीं, ी गेल्यावर भोजराजा तुझ्याकडे येईल त्या वेळीं तूं त्याला असें ांग कीं, 'आज आपण गाढवाप्रमाणें सूर काढून दाखवाल तर आपणास दार उघडीन ! हें काम करशील तरच तुझ्यावर माझें म राहील; नाहीं तर पुनः तुझें तोंड पाहणार नाहीं ! ' याप्रमाणें ांगून कालिदास निघून गेल्यावर कांहीं वेळानें राजा नायकिणीकडे आला व दारावर थापा मारूं लागला. तेव्हां तिला कालिदासानें जसें शिकविलें होतें तसें तिनें राजाला सांगितलें. तें ऐकतांच येथें आपला सूर ऐकत बसणारा कोण आहे, असें मनांत आणून राजानें गाढवाप्रमाणें दोन सूर काढले. ते ऐकतांच नायकिणीनें राजाला दार उघडलें व 'आपण सांगितल्याप्रमाणें आज कालिदासाकडून हजामत करविली आहे' असें सांगितलें. तें ऐकतांच राजानें तिला बक्षीस दिलें आणि रात्रभर राहून सूर्योदयसमयीं आपल्या महालाचा मार्ग धरिला.

दुसऱ्या दिवशीं राजाच्या सभेंत कालिदास आला तेव्हां त्यानें हजामत करविलेली राजाच्या दृष्टीस पडली. तेव्हां राजानें हास्यवदन करून त्याच्याकडे पाहिलें आणि त्याला विचारलें, 'कालिदास कविश्रेष्ठ किं ते पर्वणि मुंडनम् । '

**अर्थ**—अहो कविश्रेष्ठ कालिदास, आज कोणती पर्वणी आहे म्हणून मुंडन करविलें बरें ?

याप्रमाणें राजानें केलेला प्रश्न ऐकतांच कालिदासानें भीड आणि भीति हे दोन्ही प्रकार बाजूला सारून उत्तर दिलें, ' राजा, गर्दभ-गायन्ति अत्र पर्वणि मुंडनम् । '

**अर्थ**—प्रत्यक्ष राजेलोक गाढवाप्रमाणें ज्या वेळेस गातील त्या वेळेस पर्वणीच आहे असें समजून प्रजेनें मुंडनादि प्रायश्चित्तविधींचें आचरण करावें अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे.

हें उत्तर ऐकतांच राजाला खूण पटली व रागास न येतां त्यानें कालिदासाला आलिंगन दिलें.



## गोष्ट ८ वी

### ब्राह्मणस्त्रीच्या पातिव्रत्यावरील समस्यापूर्ती

एक ब्राह्मण अनेक देश पाहून शेवटीं मालव देशांत (माळव्यांत) आला. त्या समयीं सर्व मालवदेश भोजराजाच्या ताब्यांत असून त्याची राजधानी धारानगरींत होती. म्हणून तो ब्राह्मण इकडे तिकडे न जातां धारानगरींत आला. भोजराजाची भेट घेण्यास कोणत्याही ब्राह्मणाला कोणत्याही वेळीं मोकळीक असे. त्यामुळें एके दिवशीं सायंकाळीं तो ब्राह्मण राजाच्या दर्शनासाठीं गेला. राजानें त्याचा आदरसत्कार करून पूजन–दक्षिणा दिल्यावर राजानें ब्राह्मणाला विचारिलें, ' महाराज, आपण अनेक देश पाहिले. त्यांत कांहीं आश्चर्यकारक प्रकार पाहिला आहे काय ? ' तेव्हां तो ब्राह्मण म्हणाला, ' मी एक आश्चर्यकारक प्रकार पाहून त्यासंबंधाची एक समस्याही तयार करून आलों आहें. आपल्या सभेंतील

विद्वानांपैकीं कोणी ती पूर्ण करील तर मला फारच आनंद होईल.' राजा म्हणाला, ' वा ! वा ! ती समस्या आणि वृत्तांत जरूर सांगा.' असें ऐकतांच ब्राह्मण म्हणाला,

'हुताशनश्चंदनपङ्कशीतलः । '

अर्थ—अग्नि चंदनाप्रमाणें शीतल झाला.

याप्रमाणें समस्या ऐकल्यावर राजानें त्याबद्दल वृत्तांत विचारिला. तेव्हां ब्राह्मण आनंदानें सांगूं लागला.

" मी फिरत फिरत हिमालयावर गेलों असतां तेथें अनेक ऋषी व तपस्वी दृष्टीस पडले. त्यांचीं दर्शनें घेत फिरूं लागल्यावर एके दिवशीं एका तपस्व्याच्या आश्रमांत अगदीं मध्यान्हकाळीं जाऊन उभा राहिलों. त्या वेळीं तो तपस्वी वैश्वदेव करून काकबलि घेऊन बाहेर आला होता. मला पाहतांच त्या तपस्व्याला आनंद झाला व ' माझें स्नानसंध्यादिक सर्व आन्हिक आटोपलें आहे ना ? ' असें त्यानें विचारिलें. मीं 'होय ' म्हटल्यावर त्याच्या एका शिष्यानें माझी पडशी खुंटीला लावली व मला पाय धुण्यासाठीं पाणी आणून दिलें. आश्रमांत त्या तपस्व्याची पत्नी आमचीं पानें वाढीत होती. मी पाय धुतले व सोंवळें नेसून त्या शिष्यानें दाखविलेल्या पाटावर जाऊन बसलों तों त्या बाईचें तान्हें मूल, जें फार वेळपर्यंत निजलें होतें तें जागें झालें आणि फारच रडूं लागलें. म्हणून ती आमचीं पानें वाढण्याचें टाकून मुलाजवळ गेली व त्याची समजूत करूं लागली. पण तें अधिकाधिक रडूं लागलें. इतक्यांत तो तापसी, बलि समर्पण करून आंत येऊन एका पाटावर बसला. पानें वाढण्यास उशीर होऊं लागल्यामुळें तो रागानें आपल्या बायकोकडे

पाहूं लागला. त्या बायकोच्याही तें ध्यानांत आलें, पण करते काय ? मूल रडण्याचें थांबेना व तिला हलतां येईना. शेवटीं फारच उशीर झाल्यानें तपस्वी रागानें बायकोस बोलला. तेव्हां तिनें तें दीड वर्षाचें पोर रागानें उचललें व यज्ञशाळेंत जें अग्निकुंड पेटलेलें होतें, त्यांत नेऊन टाकून दिलें आणि ती आमची पानें वाढूं लागली. तें तिचें भयंकर कर्म पाहून मला फारच वाईट वाटलें आणि या आश्रमांत बसून या कृत्येच्या हातचें भोजनही करूं नये असें मनांत येऊं लागलें; पण तो तापसी आनंदानें देवाला नैवेद्य समर्पण करूं लागला. मी पाटावरून उठण्याच्या बेतांत होतों तों त्यानें पात्रें प्रोक्षण केलीं व बायकोस हांक मारून सांगितलें, ' अगे, आतां तो मुलगा रडावयाचा राहिला असेल यासाठीं त्याला घेऊन ये बरें. नाहीं तर हे भटजीबाबा, आतां पात्रावरून उठून जातील ! ' तें ऐकतांच ती बाई पुनः अग्निशाळेच्या भागांत गेली व ज्याप्रमाणें एखादें मूल पाळण्यांतून उचलून आणावें, त्याप्रमाणें त्या मुलाला ती अग्निकुंडांतून घेऊन बाहेर आली. याप्रमाणें तिचें पातिव्रत्य पाहून मी तर आश्चर्यचकित झालों आहें व ' हुताशनश्चंदनपङ्कशीतलः ' ही समस्या घेऊन फिरत आहें. ही जो पूर्ण करील त्याला मी आपल्या गुरूप्रमाणें समजेन ! "

याप्रमाणें ब्राह्मणानें वर्तमान सांगतांच राजालाही आश्चर्य वाटलें. नंतर त्या ब्राह्मणाला रात्रभर ठेवून घेऊन दुसऱ्या दिवशीं राजा त्या ब्राह्मणासह सभेंत जाऊन बसला आणि न्यायमनसुब्याचीं कामें आटोपल्यावर जेव्हां पंडित येऊं लागले, तेव्हां प्रत्येक पंडिताला ' हुताशनश्चंदनपङ्कशीतलः ' ही समस्या त्यानें

म्हणून दाखविली. पण एकानेंही समस्या पूर्ण केली नाहीं. शेवटीं कालिदास आल्यावर राजानें ती बिकट समस्या त्याच्यापुढें म्हटली. ती ऐकतांच कालीदेवीच्या वरदानेंकरून ज्ञानी झालेला कालिदास सर्व हकीगत अगदीं माहीत असल्याप्रमाणें म्हणाला,

सुतं पतन्तं प्रसमीक्ष्य पावके
न बोधयामास पतिं पतिव्रता ॥
सदा ह्यसौ तद्व्रतशक्तिपीडितो
हुताशनश्चंदनपङ्कशीतलः ॥

अर्थ—पुत्र अग्नींत पडला तरी पतिसेवेंत व्यत्यय आणला नाहीं, तिच्या या व्रतशक्तीला भिऊन अग्नि चंदनाप्रमाणें शीतल झाला.

याप्रमाणें समस्या पूर्ण झालेली पाहून कालिदासानें पतिव्रतेचें चरित्र बरोबर ताडलें असें बोलून त्या पांथस्थानें कालिदासाची पुष्कळच स्तुति केली आणि राजानें मूल्यवान् बक्षीस देऊन कालिदासास तोषविलें.



# गोष्ट ९ वी

## सुंदर स्त्रीच्या शब्दावरील समस्या

दूरदेशीं घडलेल्या अज्ञात अशा गोष्टीही कालिदास आपल्या विद्वत्तेच्या बळानें सांगू लागल्यामुळें तर त्याची कीर्ति चोहोंकडे फारच पसरली. कालिदास आपल्या पदरीं असल्याबद्दल भोज-राजा अभिमान बाळगीत असे. कालिदासाचे पांडित्य पाहून नित्य एखादी समस्या त्याच्यापुढें करून ती पूर्ण करून घेण्याचें भोज-राजास एक व्यसनच लागलें होतें. एकदां असा प्रकार झाला

कीं, राजानें एक सुंदर स्त्री पाहिली आणि तिला वरण्याच्या खट-पटींत गुंतल्यामुळें कित्येक दिवस त्याची व कालिदासाची भेट होण्याचा योग आला नाहीं. ती स्त्री पाहिल्यापासून तिला वरून आपल्या घरीं आणीपर्यंत सभेंत जाऊन बसण्याचेंच राजानें वर्ज्य केलें होतें. राज्यसंबंधीची सर्व कामें प्रधान पहात असे. ती स्त्री प्राप्त झाल्यावर तिला एका उत्तम मंदिरांत ठेविलें व दास, दासी तिच्या सेवेस तत्पर राहूं लागल्या. नंतर एके दिवशीं राजा तिच्या मंदिरांत गेला आणि तिचा अविर्भाव पाहून समस्या सुचल्यावर ती घेऊन तो दुसऱ्या दिवशीं सभेंत आला. राजास पाहून सर्वांस आनंद वाटला, पण त्यानें घातलेली 'हूं हुं हूं हुं हुं हुं हुं हुं हूं हूं' ही समस्या ऐकून सर्व पंडितांस आश्चर्य वाटलें. पुढें कालिदास आल्यावर त्यानें पहिले तीन चरण रचून ती समस्या पूर्ण केली.

उन्नमय्य सकचग्रहमास्यं चुंबति प्रियतमे हठवृत्त्या ॥
कूजितं भवति मानधनाया हूं हुं हूं हुं हुं हुं हुं हुं हूं हूं ॥

अर्थ—रात्रौ प्रियपत्नीच्या मंदिरांत जाऊन एकाएकीं तिच्या वेणीस व हनुवटीस हात लावून हट्टानें चुंबन घेत असतां दचकून ती मानधाना स्त्री हुं हुं हूं हुं हुं हुं हूं इत्यादि कूजित ( शब्द ) करिती झाली.

हा श्लोक ऐकतांच राजाच्या चित्ताला आनंद झाला. कारण राजा रात्रौ मंदिरांत गेल्यावर खरोखर तसाच प्रकार घडला होता.



## गोष्ट १० वी

### अशिक्षित ब्राह्मणाच्या आशीर्वादाचा अर्थ

कालिदासाची भेट घेतली असतां तो अविद्वान् मनुष्यासही भोजराजाकडून द्रव्य देववितो, हें ऐकून गोदातीरीं राहणारा एक

देवदत्त नांवाचा ब्राह्मण धारानगरींत आला आणि कालिदासाची भेट घेऊन म्हणाला, 'मी गरीब ब्राह्मण असून दारिद्र्यानें अत्यंत पीडलों आहें. लहानपणीं विद्या न शिकल्यामुळें उदर निर्वाहाचें साधनही कांहीं नाहीं. याकरितां राजाकडून कांहीं द्रव्य देववून माझी चिंता दूर करावी.' देवदत्ताचें हें भाषण ऐकून कालिदासाला त्याची दया आली व त्यास त्यानें आपल्या येथें ठेवून घेऊन अश्विनी, भरणी, कृत्तिकादि सत्तावीस नक्षत्रें पाठ करण्यास सांगितलें. देवदत्ताला आजन्मांत पाठशक्तीचा अभ्यास नसल्यामुळें सत्तावीस नक्षत्रांचीं नांवें पाठ करण्यास त्यास बरेच दिवस लागले. पुढें एके दिवशीं कालिदास देवदत्तास म्हणाला, "आज मी सभेंत गेल्यावर राजाकडून पालखी पाठवून देईन. तींत बसून ये व सत्तावीस नक्षत्रांचीं नांवें तुला शिकविलीं आहेत तीं राजापुढें म्हण!" ब्राह्मणानें तें मान्य केल्यावर कालिदास भोजराजाच्या सभेंत गेला व आशीर्वाद देऊन म्हणाला, 'राजा, गोदातीरीं वास करणारा कोणी एक देवदत्त नांवाचा महापंडित माझ्या येथें उतरला आहे.' कालिदासाचें हें भाषण ऐकतांच भोजराजानें त्यास घेऊन येण्याची प्रधानास आज्ञा केली. त्याप्रमाणें प्रधान पालखी घेऊन कालिदासाचे घरीं गेला व देवदत्त पंडितास घेऊन आला. त्याबरोबर राजानें मोठ्या सन्मानानें देवदत्तास सभेंत आणून बसविलें. परंतु आजन्मांत न पाहिलेली राजसभा पाहून तो ब्राह्मण घाबरून गेला आणि अश्विनी, पुनर्वसु, रेवती व कृत्तिका या चार नक्षत्रांचींच नांवें म्हणाला. तीं ऐकून भोजराजा कालिदासाकडे वळून म्हणाला, 'आपण या पंडि-

ताची फार प्रशंसा केलीत, परंतु यास नक्षत्रांचीं नांवेंही अनुक्रमानें येत नाहींत; हें कसें ? ' हें ऐकून कालिदास म्हणाला, ' राजा, ब्राह्मण फारच विद्वान् असून त्यानें दिलेल्या आशीर्वादाचा अर्थ आपल्या लक्षांत आला नाहीं. ' असें बोलून कालिदास म्हणाला,

अश्विनी वसतु ते नृप मंदिरे मंदिरे वसतु ते पुनर्वसु ॥
रेवतीपतिकनिष्ठसेवया, कृत्तिकातनयविक्रमो भव ॥ १ ॥

**अर्थ**—हे राजा ! तुझ्या मंदिरांत अश्विनी म्हणजे घोड्यांचा वास असो, तसेंच पुनर्वसु म्हणजे द्रव्य हेंही विपुल असो त्याप्रमाणेंच रेवतीपति जो बळराम त्याचा कनिष्ठ बंधु जो श्रीकृष्ण त्याची तुला निरंतर सेवा घडो व कृत्तिकातनय जो कार्तिकस्वामी त्याच्याप्रमाणें तुझा पराक्रम असो.

ह्याप्रमाणें कालिदासानें म्हटलेला श्लोक ऐकून राजानें दैवदत्ताची क्षमा मागितली व त्यास दहा सहस्र रुपये देऊन संतुष्ट केलें. तें द्रव्य घेऊन तो देवदत्त ब्राह्मण कालिदासाचे आभार मानून आपल्या गांवीं निघून गेला.



## गोष्ट ११ वी

### भोजराजास जळक्या लांकडांची भेट

देवदत्त ब्राह्मणास राजाकडून दक्षिणा मिळाल्याचें समजल्यानंतर मुंगीपैठणास राहाणारा दुसरा एक ब्राह्मण संसारतापानें त्रस्त झाल्यामुळें कांहीं तरी द्रव्य मिळावें या आशेनें धारानगरीस आला व दुसऱ्या दिवशीं भोजराजाच्या भेटीस जाण्याचें त्यानें ठरविलें. इतक्यांत,

रिक्तपाणिर्न पश्येतु, राजानं देवतां गुरुम् ॥
दैवज्ञं भिषजं मित्रं, फलेन फलमादिशेत् ॥

**अर्थ**—कांहीं भेट घेतल्याशिवाय राजा, देवता, गुरु, ज्योतिषि, वैद्य, मित्र यांच्या भेटीस रिकाम्या हातांनीं जाऊं नये.

हा श्लोक लक्षांत येऊन ब्राह्मणानें बाजारांत जाऊन कांहीं उंसाचीं पेरीं खरेदी केलीं आणि तीं धोतरांत गुंडाळून ठेवून तो एका देवळांत येऊन स्वस्थ निजला. तो झोंपला असतां तेथील कांहीं वात्रट मंडळींनीं त्या ब्राह्मणाची कुचेष्टा करण्याच्या हेतूनें तीं उंसांचीं पेरीं काढून घेतलीं आणि त्यांऐवजीं जळक्या लांकडांचे तुकडे गुंडाळून ठेविले. ते घेऊन ब्राह्मण तसाच घरीं आला दुसऱ्या दिवशीं राजसभेंत जाण्याच्या वेळीं तो ब्राह्मण राजास देण्याची भेट उघडून न पाहतां तशीच घेऊन दरबारांत गेला आणि भोजराजापुढें ती ठेऊन त्यास आशीर्वाद देऊं लागला. परंतु उंसाऐवजीं जळकीं लाकडें निघालेलीं पाहून त्या ब्राह्मणास अति आश्चर्य वाटलें व राजा काय बोलेल याची भीतिही वाटली.

ब्राह्मणानें आणलेलीं लांकडें पाहून भोजराजास फार क्रोध आला. इतक्यांत कालिदासानें देवीच्या प्रसादानें सर्व हकीगत जाणून राजाचें समाधान करण्याकरितां व ब्राह्मणाला बक्षीस मिळावें म्हणून राजास म्हटलें, ‘हे राजा! ब्राह्मणानें जळकीं लांकडें ठेविलीं म्हणून रागावूं नकोस. कारण—

दग्धं खांडवमर्जुनेन हि वृथा कल्पद्रुमैर्भूषितम् ।
दग्धा वायुसुतेन हेमनगरी लंकापुरी स्वर्णभूः ॥
दग्धो लोकसुखो हरेण मदनो किं ते न युक्तं कृतम् ।
दारिद्र्यं जनतापकारकमिदं केनापि दग्धं नहि ॥ १ ॥

**अर्थ**—कल्पवृक्षांनीं सुशोभित असें जें खांडववन तें पंडुपुत्र अर्जुनानें अग्नीस देऊन दग्ध करविलें. तसेंच दशाननाची सुवर्णभूमि जी लंकापुरी ती मारुतीनें

जाळून टाकिली. त्याचप्रमाणें प्राणिमात्रास सुख देणारा जो पंचशर त्याला शंकरानें भस्म केलें; तथापि यांत लोकसुखाची कोणतीच गोष्ट घडली नाहीं. कारण सर्व जगांत संताप उत्पन्न करणारें असें जें दारिद्य तें जर दग्ध झालें असतें तर सर्वांस सुख झालें असतें. परंतु तें कोणीच दग्ध केलें नाहीं. सबब हे राजा ! हीं काष्ठें घेऊन माझें दारिद्य दहन कर !

अशा हेतूनें या ब्राह्मणानें हीं लांकडें तुझ्यापुढें ठेविलीं आहेत.' कालिदासाचें हें भाषण ऐकून राजाचा क्रोध नाहींसा होऊन त्यानें त्या ब्राह्मणास बहुत द्रव्य दिलें. तें घेऊन कालिदासाचे उपकार मानून तो ब्राह्मण आपल्या घरीं निघून गेला.



## गोष्ट १२ वी

### एका पंडिताची निराशा

भोजराजाच्या सभेंतील कालिदासाची विद्वत्ता पाहून सर्वांस आश्चर्य वाटत असे. त्याची कीर्ति दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें विद्यानगरींत राहणाऱ्या गुणाढ्य नांवाच्या महापंडिताच्या मनांत कालिदासास जिंकून भोजराजाच्या सभेंत श्रेष्ठ पद मिळवावें असें आलें. म्हणून तो गुप्तपणें धारानगरींत येऊन राहिला व कालिदासाची विद्वत्ता किती आहे हें अजमावूं लागला. बरेच दिवस लोटल्यावर कालिदासाचें ज्ञान पाहून त्यास जिंकण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं नाहीं असें त्यास दिसून आलें. त्यामुळें त्यास खिन्नता वाटली. तथापि एक वेळ आपण कालिदासाची समक्ष भेट घ्यावी आणि नंतर स्वनगरास जावें, अशा हेतूनें तो कालिदासाच्या घरीं गेला. हा सर्व प्रकार कालिदासास पूर्वींच अवगत झालेला असल्यामुळें तो येण्याच्या सुमारास कालिदास दासीच्या

वेषानें अंगण झाडूं लागला. इतक्यांत गुणाढ्य त्या ठिकाणीं येऊन म्हणाला, 'हे दासी, कालिदास घरांत आहेत काय ? गुणाढ्याचा हा प्रश्न ऐकून दासीरूपी कालीदास उत्तर देतात—

न खलीनखलीनया भृशं, नमयन्तुन्नमयन्नवं हयम् ॥
निरगादुरगारिरंहसा, पुरगारुत्मगोपुराद्बहिः ॥ १ ॥

अर्थ—ज्याचा गरुडासारखा चालण्याचा वेग आहे अशा नूतन अश्वास रत्नजडित लगाम घालून, त्यावर आरूढ होऊन व त्यास तुर्की चालीवर धरून रत्नकांतीप्रमाणें चमकणाऱ्या अशा मंदिरांच्या पंक्तींमधून आतांच निघून गेले.

दासीच्या तोंडचें हें भाषण ऐकून गुणाढ्य आश्चर्यचकित होऊन आपल्याशींच म्हणाला, ही दासी असून इतकी चतुर व विद्वान् आहे, त्या अर्थी आणखी हिची थोडी परीक्षा पहावी. असा विचार करून तो म्हणाला, 'हे दासी, तूं कालिदासाची सेवक असतां तुझ्या अंगावर अलंकार कां नाहींत ? ' ( स्त्रीवेषधारी कालिदासाच्या अंगावर अलंकार कोठून असणार ? ) गुणाढ्याचा हा प्रश्न ऐकून दासी त्याचें उत्तर देते—

हस्तस्य भूषणं दानं, सत्यं कंठस्य भूषणम् ॥
श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं, भूषणैः किं प्रयोजनम् ॥ १ ॥

अर्थ—दानादिक करणें हें हस्ताचें भूषण, सत्य भाषण करणें हें कंठाचें भूषण आणि अनेक शास्त्रांचें श्रवण हें कर्णाचें भूषण. असें असतां अन्य भूषणांचें काय कारण ?

या प्रकारचें उत्तर ऐकून गुणाढ्य विस्मित होऊन म्हणाला, " हे दासी, तूं कोणत्या देवाची आराधना करितेस ? ' यावर दासी म्हणते—

वि हं गो वाहनं येषां, त्रि क चा यत्र भूषणम् ॥
सा ल पा वामभागे च, ते देवाः शरणं मम ॥ १ ॥

अर्थ–वि म्हणजे गरुड, ह म्हणजे हंस, गो म्हणजे वृषभ ही तीन ज्यांची वाहनें आहेत, तसेंच त्रि म्हणजे त्रिशूल, क म्हणजे कमल, चा म्हणजे चाप हीं ज्यांच्या हस्तांच्या ठायीं वास करीत असल्यामुळें शोभा पावत आहेत; त्याचप्रमाणें सा म्हणजे सावित्री, ल म्हणजे लक्ष्मी व पा म्हणजे पार्वती ह्या ज्यांच्या वामभागीं आहेत त्या देवांची मी उपासना करितें.

हें ऐकून गुणाढ्य आपल्याशींच म्हणाला, 'यःकश्चित् जी कालिदासाची दासी तिला जिंकण्याचें सामर्थ्य जर माझ्या अंगीं नाहीं, तर मग प्रत्यक्ष कालिदासाशीं गांठ पडली असतां कसें होईल ? तस्मात आल्या मार्गानें परत जावें हें बरें.' असा विचार करून तो गुणाढ्य पंडित मुकाट्यानें आपल्या नगरास निघून गेला.



## गोष्ट १३ वी

### मूर्खाचीं पांच लक्षणें

एके दिवशीं भोजराजा आपल्या प्रिय स्त्रीच्या महालीं गेला असतां ती आपल्या दासीबरोबर एकांतीं गुजगोष्टी बोलत बसली होती. राजा त्या ठिकाणीं अकस्मात् आला, हें पाहून राणी त्यास ' या मूर्खा ' असें म्हणाली. तें ऐकून राजा आश्चर्यचकित होऊन मनाशीं म्हणाला, ' माझ्या हातून मूर्खपणाचें कांहींच कृत्य झालेलें नाहीं व राणीही एरव्हीं मला अपशब्द बोलणार नाहीं, असें असतां आज माझ्या हातून मूर्खपणा काय झाला ? ' सबब तो तसाच सर्वांच्या अगोदर सभेंत जाऊन बसला आणि जो पंडित राजदर्शनास येई त्यास ' या मूर्खा ' असें म्हणूं

लागला. तेव्हां ते सर्व आश्चर्यचकित होऊन अधोवदनानें आपल्या जागेवर जाऊन बसले. पुढें जेव्हां कालिदासाची स्वारी आली, तेव्हां त्यासही राजानें ' या मूर्खो ' असें म्हटलें. तें ऐकून कालिदास राजास विचारतो—

खादन्न गच्छामि हसन्न जल्पे,
गतन्न शोचामि कृतन्न मन्ये ॥
द्वाभ्यां तृतीयो न भवाहि राजन्
किं कारणं भोज भवामि मूर्खः ॥

अर्थ—रस्त्यानें खात खात जाणें, हंसत हंसत बोलणें, गेल्या गोष्टीचा शोक करणें, तसेंच आपल्या मुखानें आपलें गुणवर्णन करणें किंवा दोघे एकांतीं गुह्य गोष्टी करीत असतील त्या ठिकाणीं जाणें, या पांच गोष्टींपैकीं एकही गोष्ट घडली नसतां, हे राजा ! तूं मला मूर्ख कां म्हणालास ?

कालिदासाचें हें भाषण ऐकून राणी व दासी गुह्य गोष्टी बोलत असतां आपण तेथें गेलों ही आपल्या वर्तनांतील चूक राजास समजली व त्यानें सर्व वृत्तांत सभेंत निवेदन केला व स्त्रीविषयीं आलेला क्रोध शांत केला.



# गोष्ट १४ वी

## पंडितांची फजिती

कालिदासाची वाढत असलेली प्रतिष्ठा कांहीं पंडितांस सहन होत नव्हती व कालिदासाचें एखादें छिद्र काढून राजाजवळ त्याची अप्रतिष्ठा करण्याकरितां ते अगदीं टपून बसले होते. एके दिवशीं त्यांस अशी बातमी लागली कीं, कालिदास हा एका वेश्येच्या नादीं लागला असून तिची मर्जी सुप्रसन्न राखण्याकरितां नदींतील

ताजे मासे धरून तिला नित्य आणून देत असतो. हें समजतांच त्या पंडितांना अत्यानंद होऊन त्यांनीं ती गोष्ट भोजराजाच्या कानांवर घातली. तेव्हां राजास तें खरें वाटेना. कारण कालिदास हा जातीचा ब्राह्मण असून असें गैरशिस्त वर्तन त्याच्या हातून होणार नाहीं असें त्याला वाटत होतें. परंतु त्या पंडितांनीं ती गोष्ट राजाच्या प्रत्ययास आणून देण्याचें कबूल केलें, तेव्हां त्यानें त्यास संमति दिली.

ही गोष्ट त्या महाज्ञानी कालिदासास समजतांच त्यानें त्या पंडितांची पुरी फजिती करण्याचें मनांत आणलें व दुसऱ्या दिवशीं नदीवर स्नानास गेल्यावर त्यानें एक मोठा मासा धरून धोतरांत गुंडाळून ठेविला. ही गोष्ट पंडितांनीं टेहळणी करण्याकरितां ठेवलेल्या लोकांनीं पाहतांच पंडितांस कळविली. ते भोजराजाकडे जाऊन म्हणाले, " आम्हीं सांगितलेल्या गोष्टीची प्रचीति पाहावयाची असल्यास आतांच कालिदास नदीवरून स्नान करून येईल त्याचा झाडा घ्यावा म्हणजे आपली खात्री होईल ! " हें त्यांचें भाषण ऐकून राजा म्हणाला, " वास्तविक ही गोष्ट गैर असतां केवळ तुमच्या आग्रहास्तव ती मी करितों; पण तुमच्या सांगण्याप्रमाणें जर कालिदासाजवळ मत्स्य सांपडला नाहीं तर तुम्हां सर्वांस मी नगराबाहेर घालवून देईन ! " ती अट पंडितांनीं मान्य केल्यावर राजानें सेनापतीस पाठवून कालिदासास सभेंत आणविलें. त्या वेळीं पंडितांच्या सांगण्याप्रमाणें कालिदासाच्या काखेंत असलेली धोतरांत गुंडाळलेली मत्स्याकृति पाहून राजानें आश्चर्यचकित होऊन प्रश्न केला—

भोजराजाः—कक्षे किम् ? (काखेंत काय आहे?)

कालिदासः—मम पुस्तकम्. (माझें पुस्तक आहे.)

भोजराजाः—किमुदकम् ? (त्यांतून पाणी कां गळतें ?)

कालिदासः—काव्येषु रसोदकम्. (काव्याच्या ठिकाणीं जें सार आहे, तेंच उदकरूपानें गळत आहे.)

भोजराजाः—गंधः किम् ? (त्याला घाण कां येते ?)

कालिदासः—ननु रामरावणवधात्संग्रामगंधोत्कटः (राम व रावण यांचें युद्ध चाललें असतां त्यांत जे प्राणी मेले त्यांच्या प्रेताची घाण येत आहे.)

भोजराजाः—पुच्छं किम् ? (त्याला शेंपूट कां ?)

कालिदासः—खलु ताडपत्रलिखितम्. (तें पुस्तक ताडपत्रावर लिहिलेलें आहे म्हणून.)

भोजराजाः—जीवः किम् ? (तें सजीव कां ?)

कालिदासः—मम गौडमंत्रलिखितात्संजीवनं पुस्तकम्. (त्यांत गौडबंगाली मंत्र लिहिलेले आहेत सबब तें सजीव आहे.)

कालिदासाचें हें भाषण ऐकून राजा म्हणतो, "हा हा गुणाढ्यो भवान् ! (वाहवा ! कालिदास आपण गुणवान् आहांत)" असें म्हणून भोजराजानें कालिदासाच्या काखेंत असलेला मत्स्य सर्वांसमक्ष ओढला. तों खरोखरच कालीदेवीच्या प्रसादानें तेथील मत्स्य नाहींसा होऊन ताडपत्रावर लिहिलेलें एक रामायणाचें पुस्तक सर्वांच्या दृष्टीस पडलें. तें पाहतांच सर्व पंडित आश्चर्यचकित व भयभीत होऊन अधोवदन झाले. स्वतः राजासही कालिदासाची व्यर्थ हेळना केल्याबद्दल पश्चात्ताप होऊन सर्व पंडितांकडे तो रागीट

मुद्रेनें पाहून म्हणाला, “ तुमच्या नादाला लागून कालिदासासारख्या थोर आणि पवित्र पुरुषचा मी व्यर्थ अपमान केला; यास्तव पूर्वींच्या ठरावाप्रमाणें तुम्हांस योग्य शासन केलें पाहिजे ! ” असें म्हणून त्यानें प्रधानास सर्व पंडितांची घरेंदारें लुटून त्यांस हद्दपार करण्याचा हुकूम केला. तो ऐकून कालिदास म्हणाला, ‘ राजा वृक्ष जसा छेदकावर व पोषकावर सारखीच छाया करतो त्याप्रमाणें ह्या जगांत जे सुष्ट व दुष्ट लोक आहेत त्यांवर राजानें समदृष्टि ठेवली पाहिजे. ” हें ऐकून राजा म्हणाला, “ कविश्रेष्ठा ! तुझ्या गुणांची बरोबरी करणारा या जगांत दुसरा कोणीच सांपडणार नाहीं; कारण जे तुझा छळ करण्यास कारणीभूत होतात, त्यास पारिपत्य तूं उपकारानें करितोस, तस्मात् तूं धन्य आहेस ! ” असें म्हणून त्यानें सर्व पंडितांस घरीं जावयास सांगितलें व कालिदासास अमित द्रव्य देऊन मोठ्या सन्मानानें घरीं पोहोंचतें केलें. त्या दिवसापासून सर्व पंडितांस कालिदासाची मोठी भीति वाटूं लागली.



## गोष्ट १५ वी

### बुद्धिबळांतील हत्तीवरील समस्या

एके दिवशीं भोजराजा आपल्या अन्तःपुरांत प्रियसखीसहवर्तमान बुद्धिबळें खेळत बसला असतां प्रेमोत्सुक गोष्टी सुरू होऊन खेळ मागें पडला. गोष्टी बोलतां बोलतां भोजाच्या स्त्रीचा पाय लागून पटावरील हत्ती उडाला व एक उखळ होतें त्यांत पडला. तें पाहून भोजराजानें एक समस्या तयार केली व दुसऱ्या दिवशीं ती सर्व पंडितांपुढें मांडावयाची असा निश्चय केला. नंतर दुसऱ्या

दिवशीं भोजराजा सभेंत जाऊन सिंहासनावर बसल्यानंतर एकेक पंडित येऊन आशीर्वाद देऊं लागला. तेव्हां प्रत्येकास ' आतां पहा गज कसा उखळीं बुडाला ' ही समस्या घालण्याचा क्रम त्यानें सुरू केला; परन्तु एकानेंही ती पूर्ण केली नाहीं. कांहीं वेळानें कालिदास सभेंत येऊन आशीर्वाद देऊन उभा राहिला. त्या वेळीं राजानें ती समस्या त्यास म्हणून दाखविली. ती ऐकतांच कालि-देवीच्या वरप्रसादानें ज्ञानी झालेला तो कालिदास अगदीं माहीत असल्याप्रमाणें म्हणालाः—

बुद्धीबळें खेळतसे स्वकांता ॥
एकांत पाहुनि रमे पतिशीं स्वकांता ॥
तों शेवटील मोहरा चरणीं उडाला ॥
आतां पहा गज कसा उखळीं बुडाला ॥

याप्रमाणें कालिदासानें श्लोक म्हणतांच राजास खूण पटून आपली समस्या पूर्ण झाल्याचें त्यानें कबूल केलें व सभेंतील पंडितांस कालिदासाचें ज्ञान पाहून आश्चर्य वाटलें.



## गोष्ट १६ वी

### ऋतुमती स्त्रीवरील समस्या

एके दिवशीं भोजराजा आपल्या प्रासादशिखरावर बसून नगर-सौंदर्य अवलोकन करीत असतां त्याची नजर नदीतीराकडे गेली. इतक्यांत असा प्रकार झाला कीं, स्नानाकरितां गेलेली एक तरुणी मार्गांत ऋतुमती झाल्यामुळें स्नान न करितां तशीच परत निघाली. हा चमत्कार पाहून राजानें एक समस्या तयार केली व ती पंडितांपुढें

मांडावयाचा निश्चय केला. त्याप्रमाणें भोजराजा सभेंत गेल्यावर पंडितांस म्हणाला, ज्या श्लोकाचा चौथा चरण " गेली परंतु तरुणी परतोनि आली " असा आहे तो श्लोक म्हणावा. राजानें घातलेली समस्या ऐकून सर्व पंडित स्तब्ध बसले; परंतु कालिदास चट्दिशीं म्हणाला,

कार्तीकमासीं शर गौतमी जलीं ।
करावया स्नान सखी निघाली ॥
मार्गांत जातां ऋतुवंत झाली ।
गेली परंतु तरुणी परतोनि आली ॥

**अर्थ**–कार्तिकमासाचें सुफलदायक जें गंगास्नान तें करण्याकरितां एक तरुणी जात असतां मार्गांमध्यें ऋतुमती झाल्याकारणानें तशीच घरीं परत आली.

हें कालिदासाचें भाषण ऐकतांच राजानें कालिदासाचा बहुत सन्मान केला.



## गोष्ट १७ वी

### तूप खाऊन आंधळा झालेल्या ब्राह्मणाची गोष्ट

एके दिवशीं भोजराजा पर्वकालानिमित्त गौतमी नदीवर स्नानास गेला होता. ते दिवस वर्षाऋतूचे असल्यामुळें नदीस अतिशय पूर आला होता. त्यांत एका शक्तिहीन झालेल्या सर्पाच्या मस्तकावर एक बेडूक बसून तो साप वाहात चालल्याचें राजास दिसले. तो अपूर्व देखावा पाहून भोजराजास मोठें नवल वाटलें. नंतर स्नान वगैरे आटोपून राजा घरीं आला व भोजन उरकून सभेंत गेला. तरी पण राहून राहून त्या गोष्टीबद्दल त्यास

श्चर्य वाटून हसूं येई. हा प्रकार पाहून कालिदासास विस्मय टल्यामुळें त्यानें राजास विचारलें, " किम् हाससि भोजराजा ? भोजराजा, कां हंसतोस ? ) " राजा म्हणाला, " सर्पो दर्दुर-हनम् ( बेडकानें सर्पास आपलें वाहन केलें होतें ! ) " तेव्हां लिदास म्हणाला, " वर्तमानेन वर्तन्ते घृतांधो ब्राह्मणो यथा । जसा काल येईल तसें वागलें पाहिजे; जसा एक ब्राह्मण घृत-तूप क्षण करून आंधळा झाला त्याप्रमाणें. ) " कालिदासाचें हें षण ऐकून राजास आश्चर्य वाटलें व तो म्हणाला, " तूप खाल्लें सतां मनुष्य पुष्ट, सतेज व जरारहित होतो; असें असतां एक ह्मण तूप खाऊन आंधळा कसा झाला ? " हें ऐकून कालिदास णाला, " हे राजा, याविषयीं एक कथा आहे ती सांगतों णजे खात्री होईल. "

पूर्वी कांचनपूर नगरामध्यें कमळाकर या नांवाचा मनुष्य राहात ता. त्याची स्त्री परम जारिणी होती. कमळाकरास स्त्रीच्या र्तनाचा जरी त्वेष येत असे तरी तो शरिरानें व द्रव्यानें निर्बळ सल्यामुळें त्याचा कांहींच उपाय चालत नसे. एके वेळीं मळाकर चिंताग्रस्त होऊन स्त्रीच्या वर्तनाविषयीं विचार करीत सतां त्यानें एक धारिष्ट करण्याचें ठरविलें. त्याची स्त्री जगदंबेच्या ालयांत नित्य जात असे. म्हणून एके दिवशीं ' कांहीं ामाकरितां दुसऱ्या गांवी जातो, ' असें स्त्रीस सांगून तो निघाला देवीच्या देवळांत येऊन तिच्या पाठीमागें गुप्त रीतीनें लपून सला. पुढें रात्रीच्या वेळीं त्याची स्त्री नित्याप्रमाणें देवीच्या र्शनपूजनाकरितां आली आणि पूजा करून प्रार्थना करूं लागली.

तेव्हां कमळाकर देवीच्या मागून गंभीर वाणीनें म्हणाला, ' हे स्त्रिये तुझी एकनिष्ठ भक्ति पाहून मी प्रसन्न झालें आहें. परंतु माझें स्वरू तुझ्यानें पाहवणार नाहीं. याकरितां तूं देवळाबाहेर जाऊन दरवाज बंद कर ! ' हें भाषण ऐकून, देवी आपणास प्रसन्न झाली असें त्य स्त्रीस वाटलें आणि ती देवीच्या आज्ञेप्रमाणें बाहेर गेली व दरवाज बंद करून देवीची स्तुति करूं लागली. तेव्हां कमळाकर देववाणी म्हणाला, ' हे स्त्रिये, तुझी जी इच्छा असेल ती सांग मी त पुरविण्यास सिद्ध आहें. ' स्त्री म्हणाली, ' आदिमाये, तुझ्या कृपे सर्व गोष्टी मला अनुकूल आहेत. तथापि माझ्या भ्रताराचे डो जाऊन तो अंध व्हावा एवढीच इच्छा आहे. ' तेव्हां देवीनें सांगि तलें ' तूं आपल्या पतीस नित्य घृतमिश्रित पदार्थ घालीत जा म्हण सहा महिन्यांनीं तो आंधळा होईल ! ' हें ऐकून आनंदित झालेल ती स्त्री घरीं आली आणि नित्य पतीची शुश्रूषा करून त्यास देवीच्य आज्ञेप्रमाणें पुष्कळ तूप खावयास घालूं लागली. हें पाहून कमळा कर स्त्रीस म्हणाला, ' पूर्वी तूं मला दुःखकारक भाषणांनीं ताड करीत होतीस, तें सोडून आतां माझी मर्जी संपादन करूं लागली हें काय ? ' तेव्हां त्याची स्त्री म्हणाली, ' जी स्त्री पतिसेवेंत तत्प राहते ती अंतीं स्वर्गास जाते व जी स्त्री पतीस दुःख देते ती नरक वास भोगिते असें पुराणांत ऐकल्यामुळें आपलें मन संतुष्ट होई अशा रीतीनें वागण्याचा मीं निश्चय केला आहे. ' तेव्हां पुराणि कानें मजवर हा उपकारच केला, असें दर्शवून तो स्वस्थ राहिल

याप्रमाणें दोन महिने गेल्यावर एके दिवशीं कमळाकर स्त्रीस म्हणाला, ' मला अलिकडे कमी दिसूं लागलें आहे, सबब एखाद्य

ाकडे तरी गेलें पाहिजे. ' तें ऐकून देवीच्या सांगण्याप्रमाणें ीति येत चालली असें वाटून तिला आनंद झाला. पुढें दिवसें- ास ती स्त्री भ्रताराची अधिकाधिक सेवा करून त्याच्या पोटांत कळ तूप जाईल असा उपाय करूं लागली. त्यामुळें कमळाकर पुष्ट ऊन शक्तिमान् होत चालला. जसजशी प्रकृति सुधारूं लागली तसें जास्त अंधत्व येत चाललें असें तो स्त्रीस सांगूं लागला. या ीस सहा महिने पूर्ण होतांच, कमळाकर अगदीं आंधळ्याचें सोंग ऊन चांगल्या जागेवर मुद्दाम अडखळून पडूं लागला. तें पाहून स्त्री म्हणाली, ' दुर्दैवानें तुम्हांस अंधत्व आलें; याकरितां तां एके जागीं बसून परमेश्वराचें नामस्मरण करीत जा ! ' तें मळाकरानें मान्य करून एके जागीं बसून ईशस्मरण करण्याचा ट घातला. नंतर ती जारिणी स्त्री, पति आंधळा झाला असें हून आपल्या प्रियकरास निःशंकपणें घरीं आणून व्यभिचार रूं लागली. हें अवलोकन करून एके दिवशीं संधि पाहून मळाकरानें तिच्या जारास व तिलाही यमसदनीं पाठविलें. "

इतकी गोष्ट सांगून कालिदास म्हणाला, "राजा, जर कमळा- रानें शक्तिहीन असतां स्त्रीस व तिच्या प्रियकरास शासन रण्याचें मनांत आणलें असतें तर त्याच्या हातून तशी गोष्ट न तां व्यर्थ प्राणास मुकावें लागलें असतें. त्याप्रमाणेंच बेडूक ह र्पाचा भक्ष्य जरी आहे तरी अशक्त स्थितींत नदींतून वहात सतां त्यानें बेडकास खाण्याचा प्रयत्न केला असता तर प्राणास कण्यापेक्षां जास्त कांहीं फायदा झाला नसता. यास्तव जशी वेळ ईल तसें वागलें पाहिजे ! " याप्रमाणें कालिदासाचें भाषण श्रवण रून भोजराजास आनंद झाला.



# गोष्ट १८ वी

## ब्राह्मणाचा आशीर्वादाचा अर्थ

एके दिवशीं भोजराजा सभास्थानीं विराजमान असतां दारिद्र्यानें पीडित झालेल्या एका ब्राह्मणानें सभेंत येऊन, "त्रिपीडास्तु दिने दिने" असा राजास आशीर्वाद दिला. त्या वेळीं कालिदास सभेंत आला नव्हता. ब्राह्मणानें दिलेल्या आशीर्वादाचा योग्य अर्थ न समजून भोजराजानें क्रोधायमान होऊन ब्राह्मणास धक्के मारून राजद्वाराबाहेर घालवून देण्याचा हूकूम केला. तेव्हां तो ब्राह्मण निराश होऊन प्रारब्धास दोष देत चालला असतां मार्गांत कालिदासाची व त्याची गांठ पडली. त्या वेळीं राजदरबारीं घडलेला सर्व वृत्तांत ऐकून कालिदासास अतिशय वाईट वाटलें. परंतु राजसत्तेपुढें शहाणपण टिकत नाहीं असा विचार करून त्यानें ब्राह्मणास विऱ्हाडीं स्वस्थ बसावयास सांगितलें. पुढें कालिदास जेव्हां सभेंत गेला व राजास आशीर्वाद देऊन आपल्या आसनावर बसला तेव्हां भोजराजानें, "त्रिपीडास्तु दिने दिने" ही समस्या त्याजपुढें ठेविली. ती ऐकून कालिदासानें ताबडतोब एक श्लोक म्हटला:-

प्रदाने विप्रपीडास्तु । पुत्रपीडास्तु भोजने ॥
शयने पत्निपीडास्तु । त्रिपीडास्तु दिने दिने ॥

**अर्थ**-दानादिकाविषयीं ब्राह्मणांची पीडा असो, तसेंच भोजनकालीं पुत्र (बालकें) यांची पीडा होवो व शयनकालीं धर्मपत्नीची अनेक प्रकारच्या विलासभोगांविषयीं पीडा असो. या प्रकारच्या तीन पीडा तुला प्रतिदिनीं असोत.

कालिदासानें हा श्लोक म्हटल्यानंतर स्त्री, पुत्र व धनानें जो संपन्न आहे त्यालाच त्या पीडा मिळतात; ज्याच्याजवळ त्यांचा

ाव आहे त्याला पीडा म्हणजे सुख मिळणार नाहीं असा खरा लक्षांत येऊन ब्राह्मणाचा व्यर्थ अपमान केला, याबद्दल भोज-ास पश्चात्ताप झाला व त्यानें तत्काळ पालखी पाठवून त्या ह्मणास सभेंत आणविलें आणि अपार संपत्ति देऊन संतुष्ट केलें; हां तो ब्राह्मण कालिदासाचे उपकार मानून आपल्या घरीं गेला.



## गोष्ट १९ वी

### भोजस्त्रीचें धारिष्ट

एके दिवशीं भोजराजा आपल्या प्रियस्त्रीसहवर्तमान एका उप-ांतील महालांत आनंदानें गोष्टी बोलत व तेथील सौन्दर्य अव-कन करीत बसला असतां एक कावळा तेथें येऊन ओरडला. ाबरोबर राजस्त्रीनें भयभीत झाल्याचें नाटक केलें. हें पाहून जराजा विस्मित झाला. नंतर दुसऱ्या दिवशीं सभेंत गेल्यावर जराजानें कालिदासास प्रश्न केला. ‘ दिवा काकरवात् भीता दिवसास कावळ्याचा शब्द ऐकून भय पावणारी ). ’ हें ऐकून ालिदासानें त्या स्त्रीचें वर्तन जाणून उत्तर दिलें कीं, ‘ रात्रौ तरति र्मदाम् ( ती रात्रीच्या वेळीं नर्मदा उतरून जाते. ) ’ हें ऐकून जास विस्मय वाटला व तो कांहींच न बोलतां स्वस्थ राहिला.

नंतर आपल्या महालीं गेल्यावर राजानें रात्रीं झोपेचें सोंग तलें व तो मोठ्यानें घोरूं लागला. तें पाहून राजस्त्री उठली व षांतर करून बाहेर पडली. तेव्हां राजाही तिचें चरित्र पाहण्या-रितां भिकाऱ्याचें सोंग घेऊन तिच्या पाठोपाठ चालला. कांहीं ळानें ती स्त्री, नर्मदेच्या कांठावर आली व पोहून पलीकडे

जाण्याची तयारी करूं लागली. तेव्हां राजा तिला म्हणाल
' माझीं मुलेंमाणसें पलीकडच्या तीरास राहिलीं आहेत; तरी तुम
मला आपल्याबरोबर न्याल तर मोठे उपकार होतील ! ' तें ऐकू
राजास न ओळखल्यामुळें राजस्त्री म्हणाली, ' तुझी इच्छा असे
तर मजबरोबर ये ! ' हें ऐकून भोजराजा तिच्याबरोबर परतीरा
गेला. तेथें एका गोसाव्याच्या झोपडींत जाऊन सुखविला
भोगून ती परत येण्यास निघाली. तेव्हां राजाही तिचें चरित्र पाहू
नदीतीरीं आला आणि म्हणाला, ' माझीं मुलेंमाणसें इकडे नाहीं
यास्तव पुनः पलीकडे न्याल तर अति उपकार होतील ! ' राजस्त्री
त्यास संमति दिल्यावर तिची कांस धरून नदींतून राजा जा
असतां अकस्मात् एका जलचरानें त्याचा पाय धरला. तें राजा
सांगतांच तिनें गोसाव्यानें दिलेली जादूची पेटी त्याच्या हातीं दिल
त्याबरोबर जलचरानें राजाचा पाय सोडला. नंतर अलीकडच्य
तीरावर आल्यावर राजा स्त्रीच्या अगोदर महालीं येऊन स्वस्थ
निजला. थोड्या वेळानें ती स्त्रीही येऊन त्याच्या सन्निध झोपी गेली

पुढें दुसऱ्या दिवशीं सभेंत गेल्यावर भोजराजा कालिदासास
म्हणाला, ' तन्मध्यें मगरीग्रस्तं ( नर्मदेच्या मध्यभागीं सुसरीनें
धरलें असतां ). ' त्यावर कालिदास म्हणाला, ' मर्म जानाति
सुंदरी ( त्यांतून सुटण्यास स्त्रीजवळ उपाय आहेच. )' हें ऐकतांच
राजा लज्जायमान झाला आणि कालिदासाची स्तुति करून तसाच
महालांत गेला. नंतर रात्रीं पाहिलेल्या चरित्राची यथान्याय
चौकशी करून त्यानें आपल्या स्त्रीस योग्य शासन केलें.



# गोष्ट २० वी

## कालिदासाचा गुरु

भोजराजाच्या सभेंत दहा सहस्र पंडित होते. त्यांतील कांहीं डित कालिदासाशीं वैमनस्य करीत असत. कालिदासाची मानडना कशीं होईल याची ते चातकाप्रमाणें प्रतीक्षा करीत असत. के दिवशीं एक अविद्वान् पण अंगाने अगदीं धष्टपुष्ट व गोरामटा असा दरिद्री ब्राह्मण धारानगरींत आला व भोजराजाकडून ांहीं द्रव्य मिळवून द्यावें अशाविषयीं त्यानें त्या पंडितांचें आर्जव लें. तेव्हां पंडितांनीं सांगितलें, 'बाबा रे, तूं अविद्वान् आहेस, सबब ला भोजराजाकडून कांहींएक मिळावयाचें नाहीं; परंतु आम्ही ांगूं त्याप्रमाणें वागशील तर तुझी इच्छा तृप्त होईल.' ब्राह्मण ारिद्र्यानें गांजलेला असल्यामुळें त्यानें ती गोष्ट मान्य केली. नंतर र्व पंडितांनीं कालिदासाचें वैर साधण्याचा विचार करून ाह्मणास सांगितलें कीं, 'तूं एका महंताचें सोंग घेऊन एका वळांत बैस. त्या सोंगाच्या संपादणीकरितां तुझ्याजवळ आम्हीं चारपांच शिष्य देतों. ते नेहमीं तुझ्या सेवेंत तत्पर राहून तूं कालिदासाचा गुरु आहेस असें लोकांस सांगतील. परंतु प्रत्यक्ष ुला कोणी कांहीं विचारलें तर तूं भाषण न करतां नुसत्या मानेनें ोग्य असें म्हणत जा, म्हणजे बाकीची व्यवस्था आम्ही करूं!' ब्राह्मणानें तसें वागण्याचें कबूल केल्यावर त्या पंडितांनीं चार-पांच शिष्य त्याच्या स्वाधीन केले व खर्चापुरतें थोडें द्रव्यही दिलें.

नंतर तो ब्राह्मण एका देवळांत महंताचें सोंग घेऊन बसला तेथें देवदर्शनाकरितां येणारे लोक साधूस पाहून त्याच्याबद्दल

चौकशी करीत. तेव्हां हे कालिदासाचे गुरु आहेत, असें तें शिष्
सांगत. याप्रमाणें कित्येक दिवस क्रम चालला असतां तें वर्तमा
सर्व गांवभर पसरून भोजराजासही समजलें. म्हणून राजा
कालिदासास विचारलें कीं, " तुमचे गुरु येथें आले असून तुम्ह
त्यांस सभेंत आणलें नाहीं किंवा तें वर्तमानही कळविलें नाहीं.
तें ऐकतांच कालिदासास आश्चर्य वाटून अंतर्ज्ञानानें त्यानें स
प्रकार ओळखला व तो राजास म्हणाला, " माझे गुरु येथें आले
आहेत हें अद्याप मला समजलें नाहीं. मी चौकशी करून
कळवितों. " नंतर गांवांत तपास करून कालिदास रात्रीं त्या
ढोंगी महंताकडे गेला आणि शिष्यांस बाहेर जाण्यास सांगून
वेषधारी गुरूस म्हणाला, " अरे ब्राह्मणा, मी कोण हें तूं
जाणतोस काय ? ज्या कालिदासाचा गुरु असें तूं आपणांस
म्हणवितोस तोच मी ! " तें कालिदासाचें भाषण ऐकतांच ब्राह्मण
भयानें गांगरून म्हणाला, " महाराज, मी हें ढोंग पंडितांच्या
सांगण्यावरून केवळ द्रव्येच्छेनें केलें आहे. तरी हा अपराध मला
क्षमा करा ! " ब्राह्मणाचें हें लीनतेचें भाषण ऐकून कालिदासास
त्याची दया येऊन तो म्हणाला, " तूं हें कृत्य द्रव्यप्राप्ती करितां
केलें आहेस म्हणून तुला क्षमा करतों. आतां मी सांगतों त्याप्रमाणें
कर ! ज्या वेळेस तुला भोजराजा सभेंत बोलावून नेईल त्या वेळेस
त्यानें तुला कांहीं प्रश्न केला तर तूं माझ्याकडे बोट दाखीव म्हणजे
तुझें सोंग सिद्धीस जाऊन तुझा कार्यभागही होईल ! " ती गोष्ट
ब्राह्मणानें मोठ्या संतोषानें मान्य केल्यावर कालिदास घरीं आला.

दुसऱ्या दिवशीं भोजराजानें कालिदासाच्या गुरूस पालखी
पाठवून सभेंत आणलें आणि बहुमानानें त्यास सिंहासनावर बसविलें.

र राजा कालिदासास म्हणाला, "आपल्या गुरूजवळ कांहीं षण करावें अशी इच्छा आहे." "तेव्हां कालिदास म्हणाला, "ते र्थ आहेत." हें ऐकून भोजराजा गुरुजींस म्हणाला, "महाराज, कापति जो दशानन त्याला कित्येक रावण म्हणतात तर कित्येक भण म्हणतात, तेव्हां खरें कोणतें? ब्राह्मणानें आजन्मांत राजसभा हिली नव्हती आणि अविद्वान् असल्यामुळें भाषण करण्याचा संगहि नव्हता. यामुळें तो अगदीं भांबावून गेला व कालिदासा-डे बोट दाखविण्याचें स्मरण न राहून त्यानें चटकन् 'राभण' सें उत्तर दिलें. हें ऐकून भोजराजानें चकित होऊन "आपण भण म्हणतां हें कसें?" असें गुरूस विचारलें. तेव्हां पुढें काय लावयाचें तें त्यास सुचेना; सबब त्यानें कालिदासाकडे बोट खविलें. हें पाहून कालिदासानें लगेच एक श्लोक म्हटलाः—

भकारो कुंभकर्णश्च, भकारश्च बिभीषणः ॥
तयोर्ज्येष्ठः कुलश्रेष्ठो, भकारो किं न विद्यते ॥ १ ॥

अर्थ--कुंभकर्णाचे नावांत भकार आहे आणि बिभीषणाच्या नांवामध्येंही कार आहे. सबब त्या दोघांच्या वडील बंधूच्याच नांवांत भकार का नसावा?

कालिदासाचें हें भाषण ऐकून राजानें त्याच्या गुरूस एक लक्ष हरा देऊन संतुष्ट केलें. हें पाहून सर्व पंडित आश्चर्यचकित झाले.



## गोष्ट २१ वी

### शहरांतील नागरिकांची विद्वत्ता

द्रविड देशांत तिरमल्लाचार्य या नांवाचा एक महाविद्वान् पंडित हत असे. त्याच्या कानीं कालिदासाची कीर्ति गेल्यावर एक वेळ

धारानगरींत जाऊन कालिदासाशीं वादविवाद करून त्यास जिंका असा त्यानें निश्चय केला. नंतर मजल दरमजल करीत तिर मल्लाचार्य धारानगरीजवळ आले. तेव्हां वाटेंत त्यांस एक मनुष्य भेटला. त्यास तिरमल्लाचार्यांनीं विचारलें, 'तूं कोण आहेस ?' तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं,

द्विराजी नगरी एका, नित्यं युद्धं च जायते ॥
तदुत्पत्तिकरो यस्तु, तस्याहं कुलबालकः ॥ १ ॥

अर्थ–एका नगरांत दोन राजे राज्य करीत असून नित्यशः युद्ध करतात अशीं जीं बुद्धिबळें त्यांचा उत्पन्नकर्ता जो कांतारी त्याचा मी पुत्र आहें.

हें ऐकून तिरमल्लाचार्य आश्चर्य मानून पुढें चालला. तो एक माळी वस्त्रांत कांहीं फळें बांधून घेऊन चाललेला नजरेस पडल्या वरून तिरमल्लाचार्यांनीं 'हीं कसलीं फळें घेऊन चालला आहेस ?' असें त्यास विचारलें, तेव्हां तो म्हणाला:—

वृक्षाग्रवासी न च राजहंसः । नाम्ना नरो वै न च राजपुत्रः ॥
सुवर्णकाया न च हेमधातुः । तृणं च शय्या न च राजयोगी ॥२॥

अर्थ–वृक्षाच्या अग्रभागावर वास्तव्य आहे तथापि राजहंस नव्हे, नामें करून नर आहे तथापि राजपुत्र नव्हे, सुवर्णासारखी अंगकांति आहे तथापि सुवर्ण नव्हे आणि तृणासनावर शयन करणारा आहे तरी योगी नव्हे, असा जो आंबा त्याच्या जातीचीं फळें माझ्या वस्त्रांत आहेत.

माळ्याचें हें भाषण ऐकून तिरमल्लाचार्य चकित होऊन स्वतः शींच विचार करूं लागला कीं, या धारानगरींत राहाणारे इतर लोक जर इतके विद्वान् आहेत तर ज्याची दिगंतरीं कीर्ति गाजलेली आहे. असा जो कालिदास त्याची विद्वत्ता किती असेल ! ह्याप्रमाणें विचार करीत तिरमल्लाचार्य जरासा पुढें जातो तोंच एक स्त्री डोक्यावर पाटी घेऊन जात असलेली भेटली. तिला पाहून ह्या

ारानगरींतील स्त्रियाही पुरुषांप्रमाणें चतुर विद्वान् आहेत कीं काय पहावें अशा उद्देशानें तिरमल्लाचार्यानें ' तूं कोणत्या जातीची ाहेस ? ' असा तिला प्रश्न केला. तो ऐकून ती स्त्री म्हणाली:—

निर्जीवो जीवितो वापि, श्वासोच्छ्वासविशेषतः ॥
कुटुंबकलहो नास्ति, तस्याहं कुलबालिका ॥

अर्थ–निर्जीव असतांही सजीवाप्रमाणें चलनवलन करणारा व श्वासोच्छ्वास टाकारा आणि ज्याच्या कुटुंबांत कधींही कलह नाहीं असा, जो चामड्याचा भाता, फुंकून उदरनिर्वाह करणारा जो लोहार त्याची मी कन्या आहें.

हें तिचें भाषण ऐकून तिरमल्लाचार्य आश्चर्यभरित होऊन पुन्हा हणाला, हे ' चतुर स्त्रिये, तुझ्या डोक्यावरील पाटींत काय ाहे ? ' त्यावर लोहारकन्या म्हणाली,

वृक्षाग्रे तु फलं यस्य, फलाग्रे वृक्षमेव च ॥
अकारादि सकारान्तं यो जानाति स पण्डितः ॥ १ ॥

अर्थ–वृक्षाच्या अग्रभागीं उत्पन्न झालेलें जरी फल आहे तरी फलाच्या वर पुनः क्ष आहेच व ज्याचें आद्याक्षर अ असून शेवटचें अक्षर स आहे अशीं फळें माझ्या ाटींत आहेत. हीं जो जाणील तोच खरा पंडित होय.

हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून तिरमल्लाचार्यानें पुष्कळ विचार केला, रंतु कांहींच समजेना. शेवटीं लोहारकन्येस विनंति करून विचारेलें असतां तिनें ' अननस आहेत असें सांगितलें. तेव्हां तिरमल्लाचार्य अगदीं ओशाळून आपल्याशीं म्हणाला, " या यःकश्चित् स्त्रीनें जर मला हरवलें तर कालिदासास जिंकण्याचा हेतु कसा सिद्धीस जाणार ? असो. आतां धारानगरींत जाऊन कालिदासाशीं स्पर्धा करून फजीत होण्यापेक्षां त्याच्याशीं सख्यत्व करावें हें चांगलें." असा विचार करून त्यानें कालिदासाची भेट घेतली व नेरभिमानानें आपला लाभ करून घेतला.

# गोष्ट २२ वी

## कडीच्या आवाजावरील समस्या

वसंतऋतूंत एके दिवशीं उपवनप्रासादांतील रंगमहालांत ए रत्नजडित चौपाळ्यावर पुष्पशय्या करून भोजराजा प्रियस्त्रीस वर्तमान हास्यविनोदादि क्रीडासुखांत निमग्न असतां, अकस्मा चौपाळ्याची कडी तुटून 'कडी कडाकड धप्प' असा आवा निघाला. तो ऐकून पंडितांचें चातुर्य पाहण्याकरितां भोजराजा एक समस्या तयार केली. दुसऱ्या दिवशीं सभेंत गेल्यावर जो पंडि येईल त्याच्यापुढें ती समस्या मांडण्याचा क्रम राजानें सुरू के असतां ती कोणीही पूर्ण करीना. इतक्यांत कविश्रेष्ठ कालिदासा स्वारी आली. त्यास भोजराजानें आपली समस्या म्हणून दा वितांच कालिदासानें एक दोहरा म्हटला :

भोजराज भुजंग भयो, लिपटगयो कामिनीकंठ ॥
जब आयो प्रेमरसमो तब कडी कडाकड धप्प ॥ १ ॥

**अर्थ**-प्रियसखीबरोबर प्रेमाच्या हास्यविनोदादि क्रीडा करून भोजरा भुजंगाप्रमाणें तिच्या कंठास आलिंगन देणार तोंच एकाएकीं चौपाळ्याची क तुटून 'कडी कडाकड धप्प' असा ध्वनि निघाला.

हें समस्येचें उत्तर ऐकल्यावर कालिदासाची स्तुति करू भोजराजा अंतःपुरांत निघून गेला.



# गोष्ट २३ वी

## नवा श्लोक किंवा जुनें ऋण

एके वेळीं भोजराजानें सर्व देशभर 'जो कोणी नवीन श्लो करून आणील त्यास एक लक्ष मोहरा इनाम मिळतील' अशी

दवंडी पिटविली. ती ऐकून पुष्कळ पंडितांनीं नवीन श्लोक तयार केले व ते घेऊन भोजराजाकडे ते आले. पण भोजराजाच्या सभेंत एकपाठी, दुपाठी, तिपाठी, चार पाठी असे पंडित असल्यामुळें कोणीही नवीन श्लोक म्हणून दाखविला कीं, एकपाठी यानें म्हणावें कीं, ' हा श्लोक जुना आहे, मला येतो. ' असें बोलून त्यानें तो म्हणून दाखवावा. तो दुपाठ्यानें दोन वेळ ऐकल्यामुळें ' मला येतो ' असें सांगून त्यानेंही तो लागलाच म्हणून दाखवावा, या अनुक्रमानें सर्वांनीं तो जुना ठरवावा व श्लोककारास निरुत्तर करावें. अशा रीतीनें पुष्कळ पंडितांची निराशा होऊन एक लक्ष मोहरा कोणासही मिळाल्या नाहींत. या गोष्टीस बरेच दिवस लोटल्यावर, एके दिवशीं कालिदासाची स्वारी देवदर्शनाकरितां मंदिरांत गेली असतां त्या ठिकाणीं एक अति वृद्ध ब्राह्मण दीन मुद्रेनें सचिंत बसलेला त्याच्या नजरेस पडला. तेव्हां कालिदासास दया येऊन त्यानें विचारलें, ' महाराज, आपण कोठचे राहणारे व असा विचार करीत कां बसलांत ? ' त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, ' मी मणिपूर शहराचा गरीब ब्राह्मण असून नवीन श्लोक तयार करून येथें आलों; परंतु मोठमोठ्या पंडितांचे श्लोक जुने ठरून तें इनाम कोणासच मिळत नाहीं असें समजल्यामुळें मी निराश झालों; आहे धारानगरींत येण्याचा हेलपाटा व्यर्थ गेल्यानें आतां परत कसें जावें, ही विवंचना मला पडली आहे. '

ब्राह्मणाचें हें भाषण ऐकतांच कालिदासास त्याची दया येऊन तो म्हणाला, " भटजी, तुम्ही निराश होऊं नका. मी एक श्लोक तुम्हांस सांगतों. उदईक राजसभेंत जाऊन तो म्हणा म्हणजे एक लक्ष मोहरा मिळतील ! " असें म्हणून कालिदासानें एक श्लोक

त्यास सांगितला. तेव्हां ब्राह्मणानें कालिदासाचे अतिशय उपकार मानिले. दुसरे दिवशीं तो श्लोक पाठ करून तो ब्राह्मण राजसभेंत गेला व भोजराजाची भेट घेऊन, नवीन श्लोक करून आणला आहे, असें त्यानें सांगितलें. तो श्लोक म्हणून दाखविण्याची भोजराजानें आज्ञा केल्यावरून ब्राह्मण म्हणाला—

स्वस्ति श्रीभोजराजन् त्रिभुवनविदितो धार्मिकः सत्यवक्ता ।
पित्रा ते संगृहीता नवतिनवधिका रत्नकोट्यो मदीयाः ॥
तास्त्वं देहीति राजन् सकलबुधजनैर्ज्ञायते सत्यमेतत् ।
नो वा जानंति यत्तत् मम कृतिमथवा देहि लक्षं ततो मे ॥ १ ॥

अर्थ—हे भोजराजा, तूं धार्मिक व सत्य भाषण करणारा आहेस अशी तुझी त्रैलोक्यांत कीर्ति गाजलेली आहे, म्हणून सांगतो कीं, तुझ्या पित्यानें माझ्यापासून नव्याण्णव कोट रत्नें उसनीं घेतलीं आहेत तीं तूं माझीं मला दे. ही गोष्ट सत्य असून तुझ्या सभेंतील पंडितांसही ठाऊक आहे. परंतु जर ते जाणत नसतील तर हा श्लोक नवीन आहे, असें समजून त्याबद्दलचें इनाम एक लक्ष मोहरा मला दे !

ब्राह्मणाचा हा श्लोक ऐकतांच सभेंतील एकपाठी, दुपाठी यांचीं तोंडें बंद झालीं. कारण श्लोक जुना ठरला तर नव्याण्णव कोट रत्नें राजाच्या बापाकडे येणें आहेत असें सिद्ध होतें. हा प्रकार पाहून राजा विस्मित झाला व हें कर्तृत्व कालिदासाचेंच असावें, असें समजून मुकाट्यानें त्या ब्राह्मणास एक लक्ष मोहरा व वस्त्रालंकार देऊन त्यानें संतुष्ट केलें.



## गोष्ट २४ वी

### कालिदासाचें देशांतर व पुनः आगमन

एके दिवशीं भोजराजा कांहीं कारणावरून कालिदासावर संतप्त झाला व रागाच्या भरांत त्यानें त्यास अरण्यांत नेऊन ठार

मारण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें मारेकऱ्यांनीं त्यास घोर अरण्यांत नेऊन भोजराजाची आज्ञा सांगतांच कालिदासानें विचार केला कीं, आपण राजाचा कांहीं अपराध केला नसतां त्यानें ही मरणाची शिक्षा अविचारानें दिली आहे. या प्रसंगीं या मारेकऱ्यांचें आर्जव करून व लालूच दाखवून आपला जीव बचावला पाहिजे. असा विचार करून त्यानें महाकालीचें स्मरण केलें आणि मारेकऱ्यांस द्रव्याची लालूच दाखवून जीवदान देण्याविषयीं विनंति केली. तेव्हां मारेकऱ्यांनींही विचार केला कीं, महाराजांनीं केवळ अविचारानें यास मारण्याची आज्ञा केली असून थोडक्याच दिवसांत त्यांस या गोष्टीचा पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाहीं. याकरितां आपण यास सोडून देऊन 'मारिलें' असें लटकेंच सांगावें. याप्रमाणें बेत करून ते कालिदासास म्हणाले, "बाबा रे, आम्ही तुला सोडतों, परंतु तूं जिवंत आहेस, असें जर राजास समजलें तर आम्हांस तो शिक्षा करील. एवढ्याकरितां तूं आपला वेष बदलून कोठें तरी परदेशीं निघून जा !" ती गोष्ट कालिदासानें मान्य केल्यावर कालिदासास सोडून देऊन ते सेवक परत गेले व कालिदासास मारल्याबद्दल त्यांनीं राजास खोटेंच सांगितलें. सेवक गेल्यावर कालिदासही पोशाख बदलून सामान्य वेषानें देशांतरास निघून गेला.

कालिदास गेल्यावर राजास वरचेवर त्याची गरज भासूं लागली आणि अ, प्र, शि, ख या चार अक्षरांच्या पत्राबद्दल जो एक खटला राजाकडे आला त्यांतील या चार अक्षरांचा अर्थ कोणासही लावतां येईना. तेव्हां राजानें कालिदासाबद्दल स्वतः चौकशी केली. या चार अक्षरी पत्राची हकीगत अशीः—धारानगरीं-

तील दोन ब्राह्मणांचे मुलगे, एक सुशर्मा व दुसरा विष्णुशर्मा, असे फार दिवसांपूर्वी काशीक्षेत्रीं विद्याभ्यास करण्याकरितां गेले होते. तेथें सुशर्मा स्नानसंध्यादि षट्कर्मे आचरून शुचिर्भूततेनें विद्याभ्यास करी व विष्णुशर्मा मुखप्रक्षालनही न करतां केवळ अघोरीपणानें विद्याभ्यासंगास लागे, असा त्या दोघांचा क्रम होता. पुढें कांहीं दिवसांनीं ते दोघेही सर्व विद्यांत निष्णात झाल्यामुळें गुरूचा आशीर्वाद घेऊन घरीं येण्यास निघाले. एके दिवशीं मार्गामध्यें नदीकिनारीं स्नानसंध्या करण्याकरितां ते उतरले असतां सुशर्म्यास वाटलें कीं, आपल्याजवळ शिधासामुग्री आहे, सबब येथेंच भोजन करून मार्गास लागावें. म्हणून हा विचार त्यानें आपल्या मित्रासही कळविला. तेव्हां तो म्हणाला, "येथें पाकसिद्धि करण्यास विस्तव कोठें आहे ?" तेव्हां सुशर्मा म्हणाला. "त्याची तुला काळजी नको. विस्तव मी सिद्ध करतों ! तूं फक्त पाक-निष्पत्तीच्या तयारीला लाग !" तें विष्णुशर्म्यानें कबूल करतांच सुशर्म्यानें लांकडें जमा केलीं व मंत्र म्हणून अग्नि प्रदीप्त केला. तें पाहून विष्णुशर्म्यास वैषम्य वाटून तो आपल्या मनांत म्हणाला, "आम्हीं दोघांनीं एकाच गुरुजवळ विद्याभ्यास केला असून याच्या मंत्राची जशी सिद्धता आहे तशी माझी नाहीं त्यामुळें आम्ही दोघेही घरीं गेल्यावर याच्या विद्वत्तेपुढें माझें तेज पडणार नाहीं आणि लोक माझा उपहास करूं लागतील; त्यापेक्षां यास ठार मारून एकटेंच घरीं जावें हें बरें." असा विचार करून सुशर्मा निद्रिस्त असतां तलवार उपसून त्याचा वध करण्यास तो सिद्ध झाला. तेव्हां सुशर्म्यानें न मारण्याविषयीं दीनवाणीनें विष्णु-शर्म्याची बरीच काकुळत केली; परंतु तो कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं

निरुपाय जाणून सुशर्मा म्हणाला, 'तूं मला मारणार तर मार, परंतु तुजजवळ मी चार अक्षरें लिहून देतों तीं माझ्या बापास नेऊन दे!" विष्णुशर्म्यानें तें मान्य केल्यावर सुशर्म्यानें एका झाडाच्या पानावर नखांनीं कोरून अ, प्र, शि, ख, अशीं चार अक्षरें लिहून दिलीं व विष्णुशर्म्यानें त्याचा वध केला. नंतर तो मित्रघातकी विष्णुशर्मा मजलेमजलेनें कित्येक दिवसांनीं घरीं आला. तें सुशर्म्याच्या बापास समजतांच तो आपल्या मुलाचा शोध घेण्यास गेला असतां विष्णुशर्मा म्हणाला, " सुशर्म्याचा विद्याभ्यास अजूनपर्यंत पूर्ण झाला नाहीं; सबब तो आला नाहीं. माझा विद्याभ्यास पूर्ण झाल्यामुळें गुरूनें मला जावयास सांगितल्यावरून मी एकटाच आलों. तुमच्या मुलानें हें पत्र दिलें आहे. " असें म्हणून सुशर्म्यानें चार अक्षरें लिहून दिलेलें वृक्षपर्ण त्याच्या हातीं दिलें. तें चार अक्षरी पत्र पाहून सुशर्म्याच्या बापास कांहीं बोध होईना. सबब तो मोठमोठ्या पंडितांकडे गेला; तथापि अ, प्र, शि, ख या चार अक्षरांचा अर्थ सांगण्यास कोणीच समर्थ झाला नाहीं.

शेवटीं भोजराजाच्या कचेरींत महान् महान् विद्वान आहेत, तेथें या पत्राचा उलघडा होईल अशा समजुतीनें सुशर्म्याचा बाप राजदरबारीं गेला आणि भोजराजास आशीर्वाद देऊन त्याचेपुढें त्यानें तें पत्र ठेविलें. नंतर सर्व हकीगत सांगून विनंति केली कीं, " आपल्या पदरीं विद्वद्रत्न बहुत आहेत; याकरितां कृपा करून या पत्राचा अर्थ काय होतो तो सांगावा.' सुशर्म्याच्या बापाचें हें भाषण ऐकून भोजराजानें आपल्या पदरच्या सर्व पंडितांस या पत्राचा अर्थ विचारला; परंतु कोणीही उत्तर देईना. तेव्हां भोजराजास अतिशय

राग येऊन तो म्हणाला, " माझ्या पदरीं इतके पंडित असून जर या पत्राचा अर्थ कोणास लागला नाहीं, तर सर्व जगभर माझी अपकीर्ति होईल; याकरितां जर आजपासून दोन महिन्यांच्या आंत अ, प्र, शि, ख या चार अक्षरांचा अर्थ तुम्हीं सांगितला नाहीं तर सर्वांस देहान्त शिक्षा दिली जाईल ! "

पंडितांस अशी ताकीद देऊन राजानें सुशर्म्याच्या बापास सांगितलें कीं, " जर या वेळीं कालिदास असता तर तुमच्या पत्राचा अर्थ त्यानें सांगितला असता; परंतु आतां नाइलाज आहे. सबब तुम्ही दोन महिनेपर्यंत दम धरा. तितक्या मुदतींत तुमच्या पत्राच्या अर्थाचा मी शोध लावितों." असें सांगून त्यानें त्याची रवानगी केली.

कालिदास गेल्यावर भोजराजास त्याची पदोपदीं गरज लागत असे. त्या प्रत्येक वेळीं आपण अशा विद्वान् मनुष्यावर मूर्खपणें इतराजी केली असा त्यास पश्चात्ताप होत असे. परंतु या वेळीं भोजराजास कालिदासाचा इतका ध्यास लागून गेला कीं, तो मारेकऱ्यांच्या हातून कधींच मारला जाणार नाहीं, असा विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें त्या मारेकऱ्यांस बोलावून आणून अभय दिलें आणि खरा प्रकार सांगण्याची आज्ञा केली. तेव्हां मारेकऱ्यांनीं झालेला खरा प्रकार निवेदन केला. तें ऐकून भोजराजानें आनंदित होऊन मारेकऱ्यांस बक्षीस दिलें. नतंर कालिदास हल्लीं कोठें आहे हें समजण्याकरितां त्यानें सर्व देशांत दवंडी पिटविली कीं, " जो कोणी अ, प्र, शि, ख या चार अक्षरांचा अर्थ सांगेल त्यास अगणित द्रव्य मिळेल ! "

ही दवंडी कालिदास बंगालदेशीं असतां त्याला समजली. तेव्हां त्यानें एका विद्वान् पण गरीब अशा कुटुंबवत्सल ब्राह्मणास एक श्लोक तयार करून देऊन सांगितलें कीं, " हा श्लोक तूं धारानगरींतील भोजराजास म्हणून दाखीव म्हणजे त्यानें अ, प्र, शि, ख या चार अक्षरांचा अर्थ सांगणारास जें बक्षीस देण्याची दवंडी पिटविली आहे तें बक्षीस तुला मिळेल. परंतु हा श्लोक कालिदासानें करून दिला आहे असें मात्र तूं बोलूं नकोस ! " इतकें सांगून त्या ब्राह्मणास कालिदासानें धारानगरीस पाठवून दिलें.

भोजराजानें आपल्या सभेंतील पंडितांस जी दोन महिन्यांची मुदत दिली होती, ती पूर्ण होण्याचा समय नजीक आला तरी कोणासही त्या चार अक्षरांचा अर्थ लागेना. तेव्हां त्यांसही वाटलें कीं जर या वेळीं कालिदास असता तर आपल्यावर एवढें संकट कधींही आलें नसतें. असा विचार करून ते सर्व पंडित चिंताग्रस्त झालें. शेवटीं दोन महिने पुरे होण्यास एका दिवसाचा अवधि राहिला. तेव्हां भोजराजासही आतां आपली अपकीर्ति होईल म्हणून चिंता वाटूं लागली; तोंच कालिदासानें श्लोक देऊन पाठविलेला ब्राह्मण राजसभेंत येऊन आशीर्वाद देऊन म्हणाला, ' हे भोजराजा, तुझ्या दवंडीप्रमाणें अ, प्र, शि, ख, या चार अक्षरांचा अर्थ सांगण्यास मी सिद्ध आहें." हें ऐकून भोजराजास अतिशय आनंद होऊन त्यानें सुशर्म्याच्या बापास बोलावून आणिलें आणि ब्राह्मणास अर्थ सांगण्याची आज्ञा केली. तेव्हां कालिदासानें सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण म्हणालाः—

अनेन तव पुत्रस्य प्रसुप्तस्य वनांतरे ॥
शिखामादाय हस्तेन खड्गेनोपहतं शिरः ॥ १ ॥

**अर्थ**-तुझा पुत्र अत्यंत निद्रिस्त असतां त्याची शेंडी धरून यानें तलवारीनें त्याचें शिर तोडलें.

ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून भोजराजा म्हणाला, " महाराज, आपण सांगतां हाच अ, प्र, शि, ख या अक्षरांचा अर्थ आहे हें खरें कशावरून ? " भोजराजा हा प्रश्न विचारील, हें भविष्य महाकालीच्या वरदानानें कालिदासास पूर्वींच माहीत असल्यामुळें कालिदासानें ब्राह्मणास सांगून ठेविल्याप्रमाणें तो म्हणाला, " ज्यानें हें चार अक्षरी पत्र आणून दिलें त्यासच सभेंत बोलावून विचारा म्हणजे खात्री होईल ! "

हें ऐकून भोजराजानें विष्णुशर्म्यास बोलावून त्या ब्राह्मणानें सांगितल्याप्रमाणें विचारतांच त्यानें भयानें सर्व हकीगत कबूल केली. नंतर राजानें विष्णुशर्म्यास त्याच्या अपराधाबद्दल योग्य शासन देऊन सुशर्म्याच्या बापाची समजूत केली. इतकें झाल्यावर भोजराजास वाटलें कीं या ब्राह्मणाची ही बुद्धि नसून यास बहुधा कालिदास भेटला असावा; त्याच्यावांचून हा अर्थ सांगण्याची इतरांची प्राज्ञा नाहीं. असा विचार करून तो त्या ब्राह्मणास म्हणाला, " महाराज, आपणांस कालिदास कोणत्या ठिकाणीं भेटले होते तें सत्य सांगावें ! " राजाचें हें भाषण ऐकून ब्राह्मणानें सर्व हकीगत निवेदन केली. ती ऐकतांच भोजराजास अतिशय आनंद होऊन त्यानें ब्राह्मणास अपार संपत्ति देऊन आपल्या पदरीं ठेविलें. नंतर भोजराजानें ब्राह्मणानें सांगितल्याप्रमाणें बंगालदेशीं प्रधानासहवर्तमान जाऊन कालिदासाची भेट घेतली आणि मोठ्या सन्मानानें त्यास धारानगरींत आणिलें. त्या दिवसापासून भोजराजा कालिदासावर जास्त लोभ करूं लागला.

*

# गोष्ट २५ वी

## श्लोकांतील चातुर्य

एके दिवशीं भद्रमणी या नांवाचा एक ब्राह्मण दारिद्र्यानें गांजल्यामुळें संसाराचा व मुलाबाळांचा त्याग करून तीर्थयात्रा करीत करीत धारानगरींत आला आणि कालिदासाच्या सदय अंतःकरणाबद्दलची कीर्ति ऐकून त्यास भेटला. नंतर कालिदासास आपली सर्व हकीगत सांगून तो म्हणाला, ‘ माझ्या कपाळीं हा प्रवासीपणा असल्यामुळें थंडीवाऱ्याची पीडा होऊन अतिशय त्रास होतो. एवढ्याकरितां जर कांहीं उपकार कराल तर बरें होईल ! ’ भद्रमणींचें भाषण ऐकून कालिदासास त्याची दया आली. म्हणून त्यानें एक श्लोक तयार करून तो भद्रमणीस दिला आणि दुसऱ्या दिवशीं राजसभेंत येऊन भोजराजास तो म्हणून दाखविण्यास सांगितलें. तेव्हां भद्रमणी कालिदासाचे मोठे उपकार मानून आनंदानें बिऱ्हाडीं निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं कचेरीची वेळ होतांच भद्रमणी राजसभेंत गेला आणि भोजराजास आशीर्वाद देऊन उभा राहिला. तेव्हां राजानें विचारलें, ‘ महाराज, तुमची काय इच्छा आहे ? ’ भोजराजाचा हा प्रश्न ऐकून भद्रमणीनें कालिदासानें सांगितल्याप्रमाणें तावडतोब एक श्लोक म्हटलाः—

येते सह्याद्रिकन्यापतिसुतललना यौवनामाजि जेव्हां ।
रामस्त्रीनाम कान्हा त्यजुनि उरत तें पीडितें फार आम्हां ॥
हस्तीं हस्तीन्द्रद्वंदांतकमुखरिपुचें ज्यासि पूर्वार्ध नाहीं ।
यालागीं क्ष्मासुतेशाअरिअनुजसखी स्वल्पही येत नाहीं ॥ १ ॥

अर्थ–पर्वतापासून उत्पन्न झालेली जी गोदावरी नदी, तिचा पति समुद्र त्याचा पुत्र चंद्र, त्याची स्त्री रात्र जेव्हां आपल्या तारुण्यांत म्हणजे मध्यरात्रीच्या सुमारास येते, तेव्हां रामस्त्री सीता, तिचे नांवांतील एक काना सोडला असतां जें सीत रहातें तें आम्हांस फार पीडा करितें, कारण हस्तींचा वृंद म्हणजे समुदाय, त्याचा अंत करणरा सिंह, त्याचें मुख धारण करणारा नृसिंह, त्याचा अरि म्हणजे शत्रु हिरण्यकश्यपु त्याच्या नांवांतील पूर्वार्ध म्हणजे हिरण्य नाम द्रव्य, तें मजपाशीं बिलकूल नाहीं. यामुळें क्ष्मा म्हणजे पृथ्वी, तिची कन्या सीता, तिचा ईश रामचन्द्र त्याचा रिपु रावण, त्याचा बंधु कुंभकर्ण, त्याची सखी निद्रा ती थोडीहि येत नाहीं.

भद्रमणीचें हें चातुर्य पाहून भोजराजा संतोषित झाला आणि त्यानें त्यास वस्त्रेंभूषणें देऊन आपल्या सभेंत पंडिताची जागा दिली. तेव्हां कालिदासाचे उपकार मानून भद्रमणीनें आपल्या कुटुंबाचीं माणसें तेथें आणून सुखानें कालक्रमणा केली.



## गोष्ट २६ वी

### आशीर्वादाचा योग्य अर्थ

कोणीही दरिद्री ब्राह्मण कालिदासाकडे गेला असतां कालिदास भोजराजाकडून त्याची योग्य संभावना करवितो, अशी कीर्ति सर्वत्र पसरल्यामुळें विष्णुशर्मा या नांवाचा एक अविद्वान् ब्राह्मण धारानगरींत येऊन कालिदासास भेटला आणि आपलें वर्तमान सांगून भोजराजाकडून कांहीं द्रव्य देवविण्याविषयीं त्याची प्रार्थना करूं लागला. तेव्हां कालिदास म्हणाला, "तुमच्या अंगीं राजसभेंत दाखविण्यास कोणता गुण आहे?" त्यावर विष्णुशर्मा म्हणाला, मी लहानपणापासून आपलें सर्व आयुष्य उनाडपणांत गमविल्यामुळें ही दारिद्र्यावस्था भोगण्याचें प्रारब्धीं आलें आहे. तर मजवर कृपा करून जेणेंकरून माझें दारिद्र विच्छिन्न होईल, असें करावें."

हें त्याचें नम्रपणाचें भाषण ऐकून कालिदास म्हणाला, " आज राजसभेंत गेल्यावर भोजराजाजवळ मी तुझी प्रशंसा करीन व तुजला मोठ्या समारंभानें कचेरींत येण्याचें आमंत्रण पाठवीन. त्याप्रमाणें तूं तेथें आल्यावर राजापुढें श्रीफळ ( नारळ ) ठेवून 'आशीर्वाद् गा राया' असा आशीर्वाद् दे ! पुढची सर्व व्यवस्था मी करीन ! " इतकें सांगितल्यावर कालिदासानें विष्णुशर्म्यास जावयास सांगितलें.

पुढें कचेरींत गेल्यावर कांहीं वेळानें, भोजराजाचें अंतःकरण सुप्रसन्न आहे असें पाहून कालिदास म्हणाला, " हे राजा, आज या आपल्या नगरांत कोणी एक विष्णुशर्मा नांवाचा सर्वशास्त्र-पारंगत असा विद्वान् ब्राह्मण आला आहे." हें ऐकतांच भोजराजानें प्रधानाबरोबर पालखी पाठवून विष्णुशर्म्यास पाचारण केलें. त्याप्रमाणें तो ब्राह्मण मोठ्या थाटानें राजवाड्यासन्निध आला असतां भोजराजानें आपल्या सभेंतील महान् महान् पंडितांस विष्णुशर्म्यास सामोरें पाठविलें. नंतर ते पंडित विष्णुशर्म्यास भेटून सन्मानानें घेऊन येत असतां राजवाड्याजवळ बरींच उंटें उभीं असलेलीं विष्णुशर्म्यानें पाहिली. तसें विचित्र जनावर पूर्वी कधींच त्याच्या नजरेस न पडल्यामुळें आश्चर्य वाटून त्यानें, 'ह्या जनावरांस काय म्हणतात?' असें पंडितांस विचारलें. तें ऐकून पंडितांनीं याला 'उष्ट्र' म्हणतात असें सांगितलें. तें नांव तो लक्षांत ठेवीत आहे तोंच कालिदासानें भोजराजास देण्याकरितां जो आशीर्वाद सांगितला होता, तो विसरून राजसभेंत गेल्यावर राजापुढें नारळ ठेवून आशीर्वाद् गा राया, असें म्हणण्याऐवजीं ' उशरट गा राया ' असें तो ब्राह्मण म्हणाला. हें ऐकून भोजराजा आश्चर्यचकित होऊन कालिदासा-

कडे पाहूं लागला असतां कालिदास म्हणतो, " राजा, ब्राह्मण फार विद्वान् आहे. परंतु त्याच्या आशीर्वादांतील अर्थ तुम्हांस समजला नाहीं." असें म्हणून कालिदासानें श्लोक म्हटला :—

उमया सहितो रुद्रः शंकरः शूलपाणिनः ॥
रक्षतु त्वां हि राजेंद्र टकारो घनगर्जना ॥ १ ॥

**अर्थ**-हे राजा, पार्वतीसहवर्तमान शूलपाणी शंकर तुझें रक्षण करो आणि मेघ जे आहेत ते गर्जना करून तुझ्या राष्ट्रावर वर्षोत, तुझें राज्य सुखी असो !

कालिदासाचें हें भाषण ऐकून भोजराजानें एक सहस्र मोहरा देऊन विष्णुशर्म्यास संतोषित केलें. त्यामुळें तो ब्राह्मण कालिदासाचे उपकार मानून मोठ्या आनंदानें आपल्या घरीं गेला.



## गोष्ट २७ वी

### अजिंक्यपत्रासाठीं आलेल्या पंडिताची चूक

मिथिला नगरींत राहणारा गुणाधिप नांवाचा एक महापंडित दिग्विजय करण्याच्या इच्छेनें देशोदेशींचीं अजिंक्यपत्रें घेत चालला होता. पुढें कालिदासाची कीर्ति ऐकून तो धारानगरींत येऊन एका देवालयांत उतरला. तेथून तो नित्यशः पालखींत बसून सर्व नगरभर फिरूं लागला. ही गोष्ट कालिदासास समजतांच त्याची फजीति करण्याचा विचार करून एके दिवशीं कालिदासानें एका भोयाचा वेष घेतला आणि तो देवालयाच्या बाहेर येऊन उभा राहिला. गुणाधिपाची फिरण्याची वेळ होतांच त्याच्या शिष्यानें "कोणी भोई आहेत काय ?" असें विचारलें. तेव्हां कालिदास स्वतः पुढें झाल्यावर गुणाधिपाच्या शिष्यानें आणखी तिघांजणांस घेऊन

येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें कालिदास आणखी तीन भोई घेऊन आल्यावर गुणाधिप पालखींत बसला आणि ती पालखी बाजार व राजवाडा यांवरून फिरून परत देवळांत आली. तेव्हां गुणाधिप पालखींतून उतरतांना भोयांस म्हणाला :——

अयमांदोलिका दंडः स्कंधे किं तव बाधति ॥

अर्थ–हे वाहकांनो, पालखीच्या दांड्यानें तुमच्या खांद्यांस कांहीं इजा दिली काय ?

या ठिकाणीं 'बाधते' असा व्याकरणशुद्ध शब्द म्हणण्याऐवजीं 'बाधति' असा शब्द गुणाधिपानें चुकीनें म्हटला. तो ऐकून कालिदासानें उत्तर दिलें:——

न बाधते तथा मा हि यथा बाधति बाधते ॥ १ ॥

अर्थ–महाराज, आपल्या वाक्यांतील व्याकरणविरुद्ध बाधति हा शब्द जितका बाधला तितका पालखीचा दांडा बाधक झाला नाहीं.

भोईरूपी कालिदासाचें हें भाषण ऐकून गुणाधिप आश्चर्यानें म्हणाला, "हे वाहका, तुला हें व्याकरणाचें ज्ञान कोठून व कसें प्राप्त झालें तें सांग !" त्यावर भोई म्हणाला, "आपल्यासारख्या पंडितांच्या नेहमींच्या सहवासानें मजला थोडेंफार समजतें." तेव्हां आश्चर्य वाटून गुणाधिपानें पुनः विचारिलें, "तुला कोणत्या पंडिताचा विशेष सहवास आहे ?" भोई म्हणाला, "मी कांहीं दिवस कालिदासकवींच्या पालखीच्या कामावर होतों; त्यामुळें त्यांच्या सहवासानें मला हें ज्ञान प्राप्त झालें आहे."

भोयाचें हें भाषण ऐकून गुणाधिप आश्चर्यचकित होऊन स्वतःशीं म्हणाला, "कालिदासाच्या सहवासांतील यःकश्चित् भोयानें माझ्या बोलण्यांत जर चूक काढली तर प्रत्यक्ष त्या कालिदासाशीं वादविवाद करण्याचा प्रसंग पडला तर काय दुर्दशा

चढेल ! त्यापेक्षां निरभिमानानें कालिदासाशीं सख्यत्व करावें हें चांगलें ! ” असा विचार करून तो गुणाधिप पंडित कालिदासाच्या भेटीस गेला. तेव्हां कालिदासानेंही भोजराजाकडून मानपत्र व वस्त्रालंकार देववून त्या गुणाधिप पंडितास संतोषित केलें.



## गोष्ट २८ वी

### दुखावलेल्या कानावरील समस्या

एके दिवशीं प्रातःकाळचें सौंदर्य पाहण्याच्या उद्देशानें भोजराजा निघाला असतां सहल करीत करीत एका पाणवठ्याजवळ येऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं धारानगरींतील शेकडों स्त्रिया उदक नेण्याकरितां आल्या होत्या. त्यांपैकीं एक स्त्री पाण्याची घागर डोक्यावर घेऊन परत घरीं जात होती. इतक्यांत एका मस्त झालेल्या बैलानें धक्का मारून त्या स्त्रीस पाडल्यामुळें तिच्या डोक्यावरील घागर पडून फुटली व तिचा कानही थोडा दुखावला. हा प्रकार पाहून भोजराजानें एक समस्या तयार केली व कचेरींत गेल्यावर जो पंडित येईल त्यापुढें ती म्हणण्याचा क्रम सुरू केला; तथापि एकहि पंडित त्या समस्येचें उत्तर देऊन भोजराजाचें समाधान करण्यास समर्थ झाला नाहीं. शेवटीं नित्याप्रमाणें जेव्हां कालिदासाची स्वारी येऊन राजास आशीर्वाद देऊन आपल्या जागेवर बसली, तेव्हां भोजराजानें “ रविसुत महिसंगे फार दुःखीत झाला, “ ही तयार केलेली समस्या त्याच्यापुढें मांडली. ती ऐकून सर्व प्रकार अगदीं माहीत असल्याप्रमाणें कालिदास ती समस्या पूर्ण करण्याच्या उद्देशानें म्हणाला—

अलिकुलवहनाचें वहन आणीत होती ।
शशिधरवहनानें लोटिली मार्गपंथीं ॥
नदिपतिरिपु ज्याचा तात भंगोनि गेला ।
रविसुत महिसंगें फार दुःखीत झाला ॥ १ ॥

**अर्थ**-अलि म्हणजे भ्रमर, यांचें कुल म्हणजे समुदाय, त्याचें वहन जें कमळ, त्या कमळाचें वहन जें पाणी तें आणीत असतां शशि म्हणजे चंद्र ज्यानें मस्तकीं धारण केला आहे अशा शंकराचें वाहन जो नंदी म्हणजे बैल, त्यानें धक्का देऊन पाडल्यामुळें नदीचा पति जो समुद्र, त्याचा अरि जो अगस्तिऋषि त्याचा बाप कुंभ, तो फुटला आणि रवीचा सुत जो कर्ण म्हणजे कान तो मही म्हणजे पृथ्वी इच्या संगतीनें दुखावला.

ह्याप्रमाणें कालिदासानें समस्या पूर्ण केलेली पाहून भोजराजास अत्यानन्द झाला.



## गोष्ट २९ वी

### डाव्या हाताची कर्में

कालिदासाच्या विद्वत्तेची ख्याति सर्व देशभर पसरल्यामुळें राजाश्रयानें राहणाऱ्या कांचन नामक नगरींतील एका बाणभट्ट नांवाच्या पंडिताच्या मनांत धारानगरींत जाऊन आपल्या विद्वत्तेच्या जोरावर कालिदासाचा पाडाव करावा असें आलें. म्हणून तो बाणभट्ट पंडित धारानगरींत आला व आपला येण्याचा उद्देश त्यानें भोजराजास कळविला. राजानें तो मान्य करून उद्ईक तुमचा व कालिदासाचा पूर्वपक्ष व उत्तरपक्ष होईल, असें सांगून बाणभट्टास आदरातिथ्यानें राहवून घेतलें. पुढें संध्याकाळच्या वेळीं भोजराजा कालिदासास व बाणभट्टास बरोबर घेऊन उपवन-सौंदर्य पाहण्यास निघाला. त्या वेळीं दक्षिणभागीं कालिदास व

वामभागीं बाणभट्ट याप्रमाणें भोजराजाबरोबर सहल करीत होते. बाणभट्ट डाव्या हाताच्या बाजूस असल्यानें त्या हाताचें महत्त्व दाखविण्याकरितां बाणभट्टानें श्लोकाचे तीन चरण रचून म्हणून दाखविले, ते असेः—

गृण्हात्येव रिपोः शिरः प्रतिजवं कर्षत्यसौ वाजिनम् ।
धृत्वा चर्मधनुः प्रयाति सततं संग्रामभूमावपि ॥
द्यूतं चौर्यपरस्त्रियौ च शपथं जानाति नायं करो ।

अर्थ–हे राजा, पहा हा वामहस्त ( डावा ) जो आहे तो सव्य ( उजव्या ) हाताच्या पुढें होऊन मोठमोठीं कामें करतो. तीं कोणतीं तर युद्धसंग्रामांत गेलें असतां प्रथमतः वामहस्तानें शत्रूची शेंडी हातांत धरून सव्यहस्तानें त्याचें शिर उडवितात, तसेंच अश्वारोहण करतेवेळीं प्रथम वामहस्तानें घोड्याचा लगाम हातांत धरून नंतर अश्वारूढ होतात. त्याप्रमाणें युद्धप्रसंगीं वामहस्तानें ढाल अथवा धनुष्य धरून नंतर सव्यहस्तानें खड्ग किंवा शर मारतात. शिवाय, या वामहस्तानें निंद्य कर्में मुळींच होत नाहींत. शिवाय चोरी, द्यूतगर्म, परस्त्रीचा अंगिकार आणि शपथ हीं चार कर्में या हाताकडून कधींच घडावयाचीं नाहींत.

याप्रमाणें वामहस्ताचें गुणवर्णन करून बाणभट्ट पंडित गर्वानें म्हणाला, ‘ आतां या श्लोकाची समस्या कालिदासानें पूर्ण करावी. ’ हें ऐकून कालिदासानें तावडतोब वरील श्लोकाचा चौथा चरण म्हटलाः—

दानानुद्यमता विलोक्य विधिना शौचाधिकारी कृतः ॥ १ ॥

अर्थ–तथापि त्या वामहस्तापासून किंचितहि दानधर्म घडत नसल्यानें ब्रह्मदेवानें त्याची योजना गुदप्रक्षालनाकडे केली आहे.

याप्रमाणें कालिदासानें केलेलें भाषण ऐकून बाणभट्टाचा विरस झाला व अशा पंडिताशीं वादविवाद केला असतां व्यर्थ अपकीर्ति मात्र होईल असें जाणून त्यानें कालिदासाशीं सख्य करून आपला लाभ करून घेतला.

# गोष्ट ३० वी

## श्लोकांतील चौथा चरण योग्य कोणाचा ?

कोणीही नवीन श्लोक तयार करून आणला असतां भोजराजा पुष्कळ द्रव्य देतो अशी कीर्ति सर्वत्र पसरल्यामुळें एका वृद्ध ब्राह्मणाच्या मनांत आलें कीं, आपणही एखादा श्लोक रचून सुखी व्हावें. तो विचार सारखा मनांत राहिल्यामुळें एके दिवशीं तो गंगेवर स्नानास जात असतां त्यास वाटेंत एक मनुष्य अस्थि घेऊन येतांना दिसला. त्याच्या मागून दह्याचें मडकें घेतलेली एक गवळण पाहून कृष्णभटानें " अस्थिवत् दधिवत् चैव " असा एक श्लोकाचा चरण तयार केला. इतक्यांत एक कुष्ठरोगानें ग्रस्त झालेली स्त्री पीठ घेऊन येतांना दिसली. तिला पाहून " पिष्ठवत् कुष्ठवत् तथा " असा दुसरा चरण कृष्णंभटानें रचिला. नंतर या स्वकपोलकल्पित श्लोकांत भोजराजास कांहीं आशीर्वाद असावा असें मनांत आल्यावरून त्यानें " राजन् तव यशो भाति " असा तिसरा चरण तयार केला. परंतु पुढें चौथा चरण सुचेना. सबब त्यास वाटलें कीं आपण इतके वयोवृद्ध झालों असतांही एक श्लोकही तयार करण्याचें ज्ञान आपल्यास नाहीं, तस्मात् आपलें जिणें शष्पवत् आहे, असा विचार मनांत येऊन " वृद्धब्राह्मण शष्पवत् " असा चोथा चरण रचून त्यानें तो श्लोक पुरा केला.

याप्रमाणें श्लोक तयार करून कृष्णंभट धारानगरीस आला आणि कालिदासाची भेट घेऊन त्यानें तो श्लोक म्हणून दाखविला. तेव्हां कालिदास म्हणाला, " महाराज, तुमच्या श्लोकाचे पहिले तीन चरण बरे आहेत, पण चौथा बरा दिसत नाहीं; कारण

राजाचें यश म्हाताऱ्या ब्राह्मणाच्या शष्पाप्रमाणें पांढरें आहे असा त्याचा अर्थ होतो; सबब ' शरच्चंद्रमरीचिवत् ' असा चरण घातला असतां राजा प्रसन्न होईल!' हें ऐकून अत्यानंदानें कृष्णंभटानें तेवढी सुधारणा केली. नंतर दुसऱ्या दिवशीं राजसभेंत जाऊन कृष्णंभटानें नवीन श्लोक राजास म्हणून दाखविला. तो ऐकून भोजराजा म्हणाला, "महाराज, या श्लोकांतील तीन चरणांच्या योग्यतेचा चौथा चरण दिसत नाहीं!" तें खरें वाटून कृष्णंभट म्हणाला, "तो चरण माझा नसून कालिदासानें सांगितला आहे. माझा श्लोक याप्रमाणें:—

अस्थिवत् दधिवत् चैव पिष्ठवत् कुष्ठवत् तथा ॥
राजन् तव यशो भाति, वृद्धब्राह्मण शष्पवत् ॥ १ ॥

कृष्णंभटाचें हें भाषण ऐकून राजा हंसून म्हणाला, "आतां श्लोक जमला खरा. तुम्हांस कालिदासानें भलतेंच कांहीं तरी सांगून श्लोक बिघडविला होता." इतकें बोलून व ब्राह्मण भोळसर असून कालिदासाच्या मनांत त्यास द्रव्य देण्याचें आहे असा विचार करून राजानें दहा लक्ष रुपये देऊन कृष्णंभटास संतुष्ट केलें, तोही कालिदासाचे उपकार मानून निघून गेला.



## गोष्ट ३१ वी

### पढिक ब्राह्मणपुत्र

भद्रपूर नगराच्या ठायीं सोमदत्तभट नांवाचा एक ब्राह्मण राहात होता. त्यास भद्रमणी नांवाचा एक विचित्र स्वभावाचा मुलगा होता. एके दिवशीं रात्रीं कांहीं मंडळी त्याच्या वाड्यांत बसून गप्पा मारीत असतां एकजण बोलला कीं, "आज चांदणें काय उत्तम

प्रकारचें पडलें आहे ! अशी चांदणी रात्र प्रवासास फार चांगली. तें त्याचें बोलणें सोमदत्ताचा मुलगा भद्रमणी यानें ऐकलें. तेव्हां त्यानें विचार केला कीं, सर्व लोक म्हणतात त्या अर्थी ही गोष्ट खरीच असेल, असें मनांत आणून तो त्याच वेळीं घरांतून निघून प्रवासास चालता झाला. सारी रात्रभर चालल्यावर पहांटेच्या सुमारास तो एका गांवानजीक आला. त्याच वेळीं त्या गांवांतून कांहीं विद्यार्थी विद्याभ्यासाकरितां काशीक्षेत्रास जात होते. त्यांची व भद्रमणीची मार्गांत गांठ पडल्यावर त्यांच्याबरोबर हाही निघाला. ते सर्व कांहीं दिवसांनीं काशीक्षेत्रास जाऊन पोहोंचले. तेथें ते विद्यार्थी विश्वनाथपंडित यांच्या घरीं विद्याभ्यास करण्यास राहिले व त्यांजबरोबर भद्रमणीही विद्या शिकूं लागला. कितीएक दिवसांनीं ते सर्व विद्या शिकले; परन्तु भद्रमणीचें तारतम्यज्ञान मुळींच वाढलें नव्हतें; फक्त पाठांतर विद्या मात्र झाली.

त्या वेळीं विश्वनाथपंडित यांचा वृद्धापकाळ झाला असून त्यांस पुत्रसंतान नव्हतें. एक कन्या मात्र होती. ती उपवर झाली असें पाहून त्यांनीं विचार केला कीं, आपल्या शिष्यवर्गांतील एक गरीब विद्यार्थी पाहून त्याजबरोबर आपल्या कन्येचा विवाह करून सर्व मालमत्ता त्यांस अर्पण करावी म्हणजे आपल्यास सुखप्राप्ति होईल. त्याच्या शिष्यवर्गांपैकीं भद्रमणी हा रूपानें सुंदर होता. म्हणून त्यास आपली कन्या देण्याचा निश्चय करून त्याजबरोबर तिचा सुमुहूर्तावर त्यानें विवाह केला. नंतर एके दिवशीं विश्वनाथपंडित यांनीं जांवईबुवांस सांगितलें, "बाबा रे, माझ्या आतां वृद्धापकाळ झाला आहे. ही सर्व मालमत्ता तुझीच आहे. जर चांगल्यारीतीनें वागून ती सांभाळशील तर तुला सात पिढ्यांपर्यंत पुरण्या

सारखें द्रव्य आहे. परंतु तूं स्वस्थ बसून खाऊं नकोस! रोज कांहीं तरी उद्योग करून नवीन द्रव्य संपादन केलेंस तर कधींही तुला कांहीं कमी पडणार नाहीं!" हे सासऱ्याचे शब्द ऐकून दुसऱ्या दिवशीं भद्रमणीनें एक कुदळ घेतली व सासऱ्याच्या घराची भिंत फोडण्यास आरंभ केला. हें विश्वनाथपंडितानें अवलोकन करून भद्रमणी जांवयास विचारलें, " अहो जांवईबुवा! हें तुम्ही काय करितां?" तें ऐकून जांवई म्हणतात, " मामा कालच तुम्ही उद्योग करण्याचा सल्ला दिला. शिवाय शास्त्रांत सांगितलें आहे कीं ' उद्योगं पुरुषलक्षणम् ' यास्तव हा उद्योग करतों. तेव्हां पंडित म्हणाला, " अहो तें खरें; पण तुमच्या ह्या उद्योगानें घर पडेल ना?" तें ऐकून भद्रमणी म्हणतो, " पडलें तरी चिंता नाहीं; उद्योग केल्याशिवाय राहूं नये!" तें ऐकून पंडितानें परिक्षा केली कीं, याला तारतम्य ज्ञान नाहीं. आपल्याजवळ राहून हा पढिक मात्र झाला आहे. पुढें विश्वनाथपंडितानें जावयास पुष्कळ कापूस आणून दिला आणि जानवीं करण्यास सांगितलें. त्या दिवसापासून तो जानवीं करण्याचा उद्योग करूं लागला.

कांहीं दिवसांनीं पंडिताच्या मुलीची ऋतुशांति होऊन सायंकाळीं उभयतां स्त्रीपुरुष रंगमहालीं क्रीडा करावयास गेलीं. ती मुलगी मूळची रूपवतीच होती! त्यांत " प्राप्ते तु षोडशे वर्षे गर्दभीऽप्यप्सरा भवेत्. " मग काय! परंतु तिचें तें स्वरूप पाहून भद्रमणीस शास्त्रवचन सुचलें कीं, " कांता रुपवती शत्रुः ' ( रूपवती स्त्री शत्रु आहे ). इतक्यांत दुसरें वाक्य सुचलें, " शत्रोश्च हननं कुर्यात् " ( शत्रूला ठार करावें ). तदनंतर तिसरें वाक्य सुचलें, " स्त्रीवधः सर्वघातकाः " ( स्त्रीवधासारखा घात नाहीं ). या तीन वाक्यांत

परस्परविरोध येऊं लागला, म्हणून भद्रमणी विचार करीत बसला असतां त्याची स्त्री निद्रेनें व्याप्त होऊन एकीकडे निद्रा करिती झाली. नंतर त्यानें ठरविलें कीं, रूपवती स्त्रीस कुरूप करून मित्र करावा. परंतु कोणत्या रीतीनें कुरूप करावी, या विचारांत असतां त्याला एक युक्ति सुचली. सर्व शरिरांत मुखास प्राधान्य आहे. त्यास कांहीं अपाय करावा. असा विचार करीत आहे तों वाक्य सुचलें कीं, " नासिकं मुखमंडनम् " तेव्हां नाक कापून तिला कुरूप करावी असें ठरवून तो हत्यार पाहूं लागला. परंतु त्या ठिकाणीं हत्यार सांपडेना. एक सुपारी फोडण्याचा जुना अडकित्ता होता, तो घेऊन निद्रिस्त स्त्रीचें नाक कापण्यास तो गेला. इतक्यांत जागृत होऊन तिनें आरडाओरडा केली. त्यामुळें घरांतली माणसें खोलीचा दरवाजा फोडून आंत आलीं आणि पाहतात तों जांवईबुवा मुलीचें नाक कापण्यास झटत आहेत व ती तें कापूं देत नाहीं. तें पाहून पंडित म्हणतो, " अहो जांवईबुवा, आमच्या कन्येनें तुमचा असा कोणता अपराध केला म्हणून तुम्ही तिचें नाक कापीत होतां? " हें श्रवण करून भद्रमणीनें शास्त्रांतील वरील वाक्यें म्हणून दाखविलीं. तीं ऐकून त्यास वाईट वाटलें व असा मूर्ख जांवई घरांत बाळगिला असतां एखाद्या वेळेस तो कन्येचा जीव घेईल यास्तव, यास घरांतून हाकून द्यावा, असा विचार करून पंडित म्हणाला, " जांवईबुवा, आतां तुम्हांस जिकडे जाणें असेल तिकडे जावें; आमच्या घरीं राहण्याचें कारण नाहीं ! "

हें ऐकून भद्रमणी सासूजवळ गेला आणि " आम्ही गांवास जातों; यास्तव कांहीं फराळास द्यावें ! असें तिला म्हणाला. तेव्हां सासूबाईनीं गोड गोड फराळास करून दिलें. तें घेऊन

भद्रमणी निघाला असतां दरवाज्यांत ' पंचभिः सह गंतव्यम् ' ( एकट्यानें गमन करूं नये; जावें तर पांचांबरोबर जावें. ) हें वाक्य त्याला सुचलें, परंतु पांच सोबती कोठून मिळणार ? असा विचार करीत उभा असतां चारजण एक प्रेत उचलून व एकजण अग्नि घेऊन चाललेला त्यास दिसला. तेव्हां त्यांच्याबरोबर तो जाण्यास निघाला. त्यांनीं प्रेत नदीकांठावर ठेवून तें दहन करण्यासाठीं ते काष्ठें रचावयास लागले. इतक्यांत भद्रमणीही तेथें जवळ उतरला आणि स्नानसंध्या करून फराळ करणार इतक्यांत त्यास वाक्य आठवलें कीं, ' इष्टैः सह भुज्यताम् ' ( इष्टमित्रांस बरोबर घेऊन जेवावें ). परंतु तेथें इष्ट कोण मिळतो ? इतक्यांत दुसरें वाक्य सुचलें ' पदेन सप्तपदे मैत्री ' ( जो आपल्याबरोबर सात पावलें चालला तो मित्र ). तेव्हां हे पांचजण आपल्याबरोबर सात पावलांपेक्षां जास्त चालून आल्यामुळें हेच आपले मित्र आहेत असें समजून त्यांस फराळ करावयास येण्यास तो आग्रह करूं लागला. तेव्हां त्यांनीं त्याचा निषेध केला आणि ते येत नाहींत असें पाहून भद्रमणी मनांत म्हणतो, जे आपली गोष्ट ऐकत नाहींत ते मित्र कशाचे ? असें म्हणून व जवळ दुसरें कोणीच नाहीं असें पाहून फराळाचें गांठोडें पूर्ववत बांधून घेऊन वाटेंत कोणी दुसरा मित्र मिळेल म्हणून तो मार्ग क्रमीत चालला.

अशा तऱ्हेनें दोन दिवस भद्रमणी चालला तरीही त्यास वाटेंत कोणी भेटलें नाहीं. शेवटीं उपासमारीनें थकून तो नदीच्या किनाऱ्यास सचिंत बसला असतां एक श्वान शेंपूट हालवीत त्याच्या जवळ आलें. त्यास पाहून हा समाधान पावला आणि आपल्याबरोबर सात पावलें चालवून त्यानें त्यास आपला मित्र करून घेतला. त्यानें

त्यास कांहीं खाण्यास घालून आपण फराळ करीत आहे, इतक्यांत धारानगरींहून एक सांडणीस्वार जरुरीच्या कामानिमित्त त्वरेनें उंट हांकीत नदीपासून थोड्या अंतरावर आला, तों याची दृष्टि त्याजकडे गेली. तेव्हां हा मनांत म्हणतो, " इतक्या त्वरेनें कोण येत असेल बरें ? " इतक्यांत त्यास सुचलें कीं, "धर्मस्य त्वरिता गतिः " तस्मात् धर्मराजा येत आहेत. आतां त्यांचीं व आपली भेट कशी होईल ? या विचारांत आहे तों वाक्य सुचलें, " इष्टं धर्मेण योजयेत् " या स्थळीं इष्ट पाहिला असतां श्वान आहे, दुसरें कोणी नाहीं. यास्तव याच्याच हातून कार्य करून घेणें प्राप्त आहे. असा विचार करून त्याचे चारी पाय धरून त्याला उचललें. इतक्यांत सांडणीस्वार नदीवर आला व तो उंटास पाणी पाजीत आहे तों भद्रमणीनें त्या उंटाच्या अंगावर कुत्रें फेंकलें. त्यामुळें उंट बुजाला आणि तो स्वार व त्याचें सर्व सामान व सरकारी कागद-पत्रें हीं सर्व नदींत पडलीं आणि उंट उधळून निघून गेला.

त्या समयीं त्या स्वारास क्रोध येऊन तो म्हणाला, "अरे दुष्टा ! तूं ब्राह्मण आहेस म्हणून या वेळेस धीर धरिला; नाहीं तर तुला ठार केलें असतें ! " तें ऐकून भद्रमणी त्यास साष्टांग नमस्कार घालून म्हणाला, ' अहो धर्मराज, आज आपण इतके क्रोधयुक्त कां झालां ? ' भद्रमणीनें नमस्कार घातला म्हणून त्या स्वारानें त्यास कांहीं शिक्षा न करितां मुसक्या बांधून भोजराजाकडे पाठविलें आणि कचेरीजवळ आणून त्यास देवडीवर पहाऱ्यांत बसविलें व आपण राजाच्या भेटीस जाऊन त्यास सर्व समाचार सांगितला. त्यास घेऊन येण्याची भोजराजाकडून आज्ञा होतांच स्वार देवडीवर गेला आणि भद्रमणीस म्हणाला, " चल, आतां

तुला राजाच्या समोर उभा करितों!" तें ऐकून भद्रमणी म्हणाला, "तुम्ही मला राजाकडे नेतां काय? चला!" इतक्यांत त्याला वाक्य सुचलें कीं, 'रिक्तपाणिर्न पश्येत् राजानं देवतां गुरुम्' परंतु हातांत द्यावयास कांहींच नाहीं आणि शास्त्राप्रमाणें रिक्तहस्तें तर जावयाचें नाहीं. तेव्हां हातांत एक दगड धरून तो चालला. त्यास राजासमोर आणून स्वारानें उभा केल्यावर राजानें हें चमत्कारिक ध्यान पाहून प्रश्न केला, 'तुझ्या हातांत काय आहे?' तें ऐकून भद्रमणीनें वरील वाक्य म्हणून दाखविलें व "धर्मराजानें मजला आपल्या भेटीस कां आणिलें?" असा राजास प्रश्न केला. तो ऐकून "धर्मराज कोठें आहेत?" असा राजानें प्रश्न करतांच भद्रमणीनें स्वाराकडे बोट दाखविलें. तेव्हां राजा आणि सर्व सभासद हसूं लागले. त्यांस पाहून भद्रमणीही हसूं लागला. हें पाहून राजा विचारतो, "तूं कां हसलास?" भद्रमणी म्हणतो, "यथा राजा तथा प्रजा!" हें श्रवण करून राजा समजला कीं, हा ब्राह्मण पुष्कळ पढलेला आहे, परन्तु यास तारतम्यज्ञान मुळींच नाहीं, असें समजून त्यानें त्यास सोडून दिलें.



## गोष्ट ३२ वी

### कालिदासाची भोजराजावरील प्रीति

एके दिवशीं भोजराजा आणि कालिदास एकांतात गोष्टी बोलत असतां भोजराजानें म्हटलें, "कालिदास, तुम्हीं अनेक काव्यें तयार करितां, तरी माझ्या मरणाची एक कविता तयार करून म्हणून दाखवावी." तें ऐकून कालिदास म्हणाला, "सरकार, हें काम माझ्या हातून कदापि होणार नाहीं. त्याबद्दल आपण क्षमा

करावी. " ते ऐकून भोजराजा फारच हट्टाग्रहानें म्हणाला " त्यांत क्षमा वगैरे कांहीं नाहीं ! ती कविता आपण म्हटलीच पाहिजे ! " राजाचा तो हट्ट पाहून कालिदास तेथून रागानेंच निघून धारानगरी सोडून दूरदेशीं जाऊन राहिला.

कालिदास आपणास सोडून गेला असें समजतांच भोजराजा मनांत फारच दुःखी झाला. त्यानें जेमतेम कांहीं दिवस लोटले; परंतु कालिदासावांचून त्यास चैन पडेना. शेवटीं आपलें सर्व राज्य प्रधानाच्या ताब्यांत देऊन त्यानें जोग्याचा वेष धारण केला आणि कालिदास राहात होता त्या गांवाचा शोध करून तो तेथें गेला. नंतर संधि साधून त्यानें कालिदासाची भेट घेतली. राजा जोग्याच्या वेषांत असल्यामुळें कालिदासानें त्यास ओळखलें नाहीं. एकामेकांचें कांहीं संभाषण झाल्यावर कालिदासानें विचारलें, " योगीमहाराज, आपण कोणत्या देशीं वास्तव्य करीत असतां ? " तेव्हां योगी म्हणाला, " हे कविराज, ही पृथ्वी हाच आमचा देश आहे. आम्ही कोठेंही वास्तव्य केलें तरी सारखेंच आहे ! "

कालिदास म्हणाला, " सांप्रत आपण कोणत्या ठिकाणाहून आलां ? "

योगीः—सांप्रत मी धारानगरीहून आलों आहें.

कालिः—( आतुरतेनें ) तेथील व्यवस्था कशी काय आहे ?

योगीः—पृथ्वीपति भोजराजा नुकताच मरण पावला !

' भोजराजा मरण पावला ' हीं अक्षरें ऐकतांच कालिदास मूर्च्छित होऊन धाड्दिशीं जमिनीवर पडला. कांहीं वेळानें सावध होऊन तो शोक करूं लागला कीं , ' हे राजा, आतां पंडितांची

दाद कोण घेईल ? तुजविणें आम्हांस जगून काय करायचें आहे ? हाय हाय ! ! धारानगरी आतां शून्यवत् झाली ! ' असा नाना प्रकारें शोक करून तो म्हणालाः—

अद्य धारा निराधारा निरालम्बा सरस्वती ॥
पंडिताः खंडिताः सर्वे भोजराजा दिवं गते ॥ १ ॥

अर्थ—भोजराजा स्वर्गवासी झाला ! आतां धारानगरी निराधार झाली. सरस्वतीला ( विद्येला ) कोणाचा आश्रय उरला नाहीं व सर्व पंडित निराश्रित झाले !

वरील श्लोक ऐकून कालिदासाची आपणांवर पूर्ण प्रीति आहे असें पाहून योगीरूपी भोजराजा मूर्च्छित होऊन पडला. त्याला अशा रीतीनें मूर्च्छित झालेला पाहून कालिदास मनांत दचकला व बारीक रीतीनें त्यावर दृष्टि लावून पाहतांच हा भोजराजाच आहे अशी त्याची खात्री झाली. मग त्यास सावध करून कालिदास म्हणाला, " महाराज, आपण मला छेडिलें, पण तो श्लोक बोलण्यांत माझी थोडी चूक झाली होती. ती आतां सुधारून घेतो. " असें बोलून त्याच श्लोकांत थोड्या अक्षरांचा बदल करून कालिदास म्हणालाः—

अद्य धारा सदाधारा सदालम्बा सरस्वती
पंडिताः पंडिताः सर्वे भोजराजे भुवं गते ॥ १ ॥

अर्थ—भोजराजा ह्या पृथ्वींत जिवंत असल्यामुळें धारानगरीस उत्तम आधार आला व विद्येस आश्रय असून त्यायोगें सर्व पंडितांस भूषण आहे.

आपणावर कालिदासाची अतिशय प्रीति आहे हे पाहून भोजराजा त्यास प्रेमानें भेटून व त्याची समजूत करून धारानगरीस घेऊन आला.



# गोष्ट ३३ वी

## सतीच्या दर्शनाची भोजराजाची उत्सुकता

एके दिवशीं भोजराजानें कालिदासास प्रश्न केला कीं, " आपल्या नगरांत सती स्त्री कोण आहे ? कारण तिची परीक्षा करून तिचें दर्शन घ्यावें अशी माझी इच्छा आहे. " हें ऐकून कालिदास म्हणाला, " सरकार, आपल्या नगरांत एक विष्णुशर्मा नामें गरीब अग्निहोत्री ब्राह्मण आहे. त्याची स्त्री पूर्ण सती आहे. ह्या स्त्रीचें त्याजबरोबर लग्न झाल्यास सुमारें बारा वर्षें झालीं; परंतु त्या दिवसापासून तिनें आपल्या पतिशिवाय परपुरुषाचें मुखावलोकन केलेलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर तिनें सूर्यासही आपलें मुख दाखवून लाजविलें नाहीं ! ही स्त्री पहाटेस पतीच्या आधीं उठून स्नान वगैरे करून पतीची सेवा करिते व पति हेंच दैवत मानून त्याची आज्ञा पाळून स्वधर्माचरणानें वागते. तिचा पतिही नित्यनैमित्तिक स्नानसंध्यादि आटोपल्यावर यज्ञदेवतेची पूजा करून दैविकवृत्तीनें जें काय मिळेल तेवढ्यावर तीं स्त्रीपुरुष आपली उपजीविका चालवितात. तरी हे राजा, अशा तपस्वी ब्राह्मणाच्या स्त्रीचें दर्शन आपणासच काय परंतु देवादिकांसही दुर्लभ आहे ! "

हें कालिदासाचें बोलणें ऐकून भोजराजानें त्यास प्रश्न केला कीं, " त्या सतीचें दर्शन घेण्यास कोणता उपाय योजावा ? " तेव्हां कालिदास थोडा विचार करून म्हणाला, " सरकार त्या ब्राह्मणास द्रव्याची आशा दाखवून पाहावें. तो ब्राह्मण द्रव्याची पर्वा करणार नाहीं. तरीही यत्न करून पाहावा. "

दुसऱ्या दिवशीं राजानें विष्णुशर्म्यास बोलावणें पाठविलें, म्हणून तो आपल्या स्त्रीस विचारण्यास गेला. तेव्हां ती म्हणाली, " हे स्वामी, राजानें आपणांस कां बोलाविलें हें समजत नाहीं. तरी पण आपला तपोभंग होईल, अशी कोणतीही गोष्ट करूं नये ! " असें सांगून तिनें त्यास कचेरींत जाण्यास रुकार दिला. विष्णुशर्मा राजसभेंत गेल्यावर भोजराजानें त्याचा मोठा सन्मान करून सुवर्णमोहोरांनीं भरलेलीं ताटें त्याच्यापुढें ठेविलीं. परंतु तो तीं घेईना; म्हणून राजानें आणखी दोन ताटें आणविलीं. पण त्या द्रव्याची बिलकुल आशा न धरितां ब्राह्मण म्हणाला, " हे राजा, ह्या द्रव्याची मला कांहींच गरज नाहीं. तप आणि यज्ञदेवतेचें पूजन-अर्चन हेंच आमचें खरें ध्येय आहे. आम्हांला यज्ञनारायण जें शेरटिपरी अन्न देतो त्यांतच समाधान मानून आम्हीं आहों. मला कोणत्या कामाकरितां पाचरण केलें तेवढें सांगावें." त्याचा निरपेक्षपणा पाहून भोजराजा म्हणाला, " महाराज, आपली भेट घेण्याचाच फक्त हेतु होता. आपल्यास योग्य कांहीं काम आढळल्यास आपणांस बोलवीन ! " असें सांगून त्या ब्राह्मणास भोजराजानें रजा दिली. तेव्हां तो आपल्या घरीं निघून गेला.

ब्राह्मण गेल्यावर भोजराजानें कालिदासास म्हटलें कीं, " आतां कोणता उपाय योजावा ? " कालिदास म्हणाला, " सरकार, आतां एकच उपाय दिसतो. तो असा कीं, त्याच्या स्त्रीची संन्याशावर श्रद्धा असून ती त्याचा चांगला आदरसत्कार करिते. तेव्हां आपण संन्याशाचा वेष घ्यावा व हातांत दंडकमंडलु घेऊन तिच्या द्वारांत भिक्षेकरितां जाऊन ' भवति, भिक्षां देही ! ' असे शब्द उच्चारावे म्हणजे तिचें खचित दर्शन होईल. परंतु त्यापूर्वीं युक्तीनें ब्राह्मणाला दुसऱ्या गांवीं पाठविलें पाहिजे ! "

नंतर कांहीं दिवसांनीं भोजराजानें विष्णुशर्म्यास कचेरींत पुनः पाचारण करून सांगितलें कीं, "महाराज, कांहीं कारणानिमित्त मी श्रीविश्वेश्वरास पांचशें रुद्राभिषेक करण्याचा संकल्प केला होता. ती माझी इच्छा संपूर्ण झाली असून श्रीकाशीक्षेत्रीं जाऊन रुद्राभिषेकाचें काम तुम्ही पूर्ण करून यावें!" हें राजाचें भाषण ऐकून ब्राह्मण घरीं गेला आणि स्त्रीची आज्ञा घेऊन तेथून काशीक्षेत्रीं गेला आणि त्यानें रुद्राभिषेकाचें काम चालू केलें.

ब्राह्मण काशीस गेल्यावर एके दिवशीं भोजराजानें मुंडणादि करून भगवीं वस्त्रें धारण केलीं व दंडकमंडलु हातीं घेऊन तो विष्णुशर्म्याचे घरीं गेला. तेथें गेल्यावर 'भवति, भिक्षां देहि' असे शब्द उच्चारून तो भिक्षा मागूं लागला. त्या वेळेस विष्णुशर्म्याची स्त्री घरांत स्वयंपाक करीत होती. तिनें स्वयंपाकघरांतूनच त्यास जबाब दिला कीं, "हे महात्मा, स्वयंपाकास दोन घटिकांचा अवकाश आहे. तरी तोंपर्यंत आपण समोरील देवळांत बसावें.' परंतु त्या स्त्रीचें दर्शन घेऊन परत जाण्याची राजास त्वरा असल्यामुळें तो वेडगळासारखें करून घरांतच बसूं देण्याविषयीं आग्रह करूं लागला. तेव्हां तिनें एक आसन बाहेर टाकून त्यास घरांत बसविलें. ते दिवस चैत्र-वैशाखाचे असल्यामुळें तिनें आंब्यांचा रस काढण्याचा विचार केला होता. सर्व स्वयंपाक करून झाल्यावर आंबे धुऊन स्वच्छ करून ती रस काढण्याकरितां बसली. तीं आम्रफळें जरी रसभरित होतीं तरी त्यांतून रसाचा एकही थेंब पडेना. तेव्हां ती सती आम्रफळास उद्देशून म्हणाली,

रे रे रसालफल किं स्वरसेन मुञ्च-
स्याबालभावमपि शुद्धपतिव्रतायै ॥

सत्यं मया परनरो न कदापि दृष्टः
किं भोजराजनृपतिः परदारलुब्धः ॥ १ ॥

अर्थ—रसभरित आम्रफला, तूं रस कां सोडीत नाहींस ? मी बाळपणापसून आजपावेतों पतिव्रताधर्मानें वागत आलें आहें. मी खरें सांगतें कीं, आजपर्यंत मीं परपुरुष नजरेनेंही पाहिला नाहीं किंवा मनांत आणिला नाहीं. तर काय ? ह्या नगरीचा भोजराजा सत्यवादी असतां परस्त्रीवर लुब्ध झाला कीं काय ?

ती स्त्री इतकें बोलतांच आम्रफळांतून रसधारा येऊं लागून सर्व भांडें भरून गेलें. तें पाहून भोजराजा मनांत भयभीत होऊन थरथर कांपूं लागला व आपणाशीं म्हणाला कीं, 'ह्या सतीनें मला खरोखर ओळखिलें. मी हिच्या सतीत्वाची परीक्षा पाहण्यारितां कपट धरून आलों म्हणून ही मला शाप देईल!' अशा प्रकारें भय पावून त्यानें त्या सतीच्या पाठीमागून जाऊन पांच प्रदक्षिणा घातल्या व सविनय प्रार्थना करून तिची क्षमा मागितली आणि दंडकमंडलु तेथेंच टाकून जेवल्याशिवाय तो पळून जाऊं लागला. तें पाहून त्या सतीनें त्यास अडविलें व म्हटलें, "हे भोजराजा, आम्ही तुझी प्रजा असून तुझीं लेंकरें आहोंत. तूं सत्यवादी असून परस्त्रीस बहिणीप्रमाणें मानणारा आहेस. सबब आज बारा वर्षांत फक्त तुलाच (परपुरुषास) तोंड दाखविलें. त्यामुळें माझा व्रतभंग झाला असें मात्र समजूं नकोस. तूं जरी सत्यवादी असून परस्त्रीस लंपट होणार नाहींस, तरी कपटभावानें माझी परीक्षा घेण्याकरितां आलास म्हणून आम्रफळानें आपला रस सोडिला नव्हता; परंतु तुझ्या अपराधाबद्दल जेव्हां त्यानें भिक्षा मागितली तेव्हां त्या फळांनीं रस सोडिला." नंतर भोजराजा सर्व अपराधांची क्षमा मागून व तिची आज्ञा घेऊन परत आपल्या महालांत गेला.



# गोष्ट ३४ वी

## विपरीत समस्येची पूर्तता

एके दिवशीं भोजराजा सभेंत आल्यावर नियमाप्रमाणें सर्व पंडित राजदर्शनाकरितां येऊं लागले. तों राजा प्रत्येक पंडितास 'गौरीमुखं चुंबति वासुदेवः' ( वासुदेव पार्वतीच्या मुखाचें चुंबन घेतो ) ही समस्या घालूं लागला. त्याच्या कचेरींत जरी नऊ हजार पंडित होते तरी एकाच्यानेंही त्या समस्येचा उलगडा करवेना. कांहीं वेळानें कालिदास सभेंत आला तेव्हां त्यासही राजानें ही समस्या घातली असतां कालिदासानें पुढील श्लोक म्हटला—

का लोकमाता किमु देहमुख्यं ।
रतेः किमादौ कुरुते मनुष्यः ॥
को दैत्यहंता वद वै क्रमेण ।
गौरी मुखं चुंबति वासुदेवः ॥ १ ॥

**अर्थ**—जगाची माता कोण ? ( गौरी ) पार्वती. शरिरांत मुख्य भाग कोणता ? ( मुखं ) मुख. रतिकाळीं पुरुष स्त्रीशीं काय करितो ? ( चुंबति ) चुंबन. दैत्याला मारणारा असा पुरुष कोण ? ( वासुदेवः ) वासुदेव.

याप्रमाणें समस्या पूर्ण केलेली पाहून भोजराजास समाधान वाटलें व तो कालिदासावर विशेष ममता करूं लागला.



# गोष्ट ३५ वी

## दुसरी विपरीत समस्या

कोणतीही समस्या पंडितांपुढें घातली असतां ती त्यांच्याकडून पूर्ण न होतां कालिदासच ती पूर्ण करीत असल्यामुळें कालिदासावर

राजाची पूर्ण भक्ति असून राजा त्याचेविषयीं मनांत अभिमान बाळगीत असे. नेहमीं एखादी नवीन समस्या पुढें करून ती पूर्ण करून घेण्याचें भोजराजास व्यसन लागलें होतें.

एके दिवशीं राजानें सभेंत येतांच " रामश्चुम्बति रावणस्य वदनं सीतावियोगातुरः " ( रामचंद्र सीतेच्या वियोगानें आतुर होऊन रावणाचें मुखचुंबन करितो. ) ही समस्या पंडितांस घातली.

नेहमींप्रमाणें ती कोणाच्याही हातून पूर्ण न होतां कालिदासानें पुढील श्लोक म्हणून ती पुरी केली.

कः कान्तारमगात्पितुर्वचनतः संश्लिष्य कंठस्थली ।
कामी किं कुरुते च गृध्रहठतश्छिन्नं प्ररूढं च किम् ॥
को रक्षःकुलरात्रिरेव ह्यभवच्चन्द्रातपं द्वेष्टि को
रामश्चुम्बति रावणस्य वदनं सीतावियोगातुरः ॥ १ ॥

**अर्थ**–बापाच्या वचनास मान देऊन स्त्रीसहित अरण्याप्रत कोण गेला ? ( राम ) रामचंद्र. कामी पुरुष स्त्रीच्या कंठास आलिंगून काय करतो ? ( चुंबति ) चुंबन घेतो. गीध पक्षी ( जटायु ) चे हट्टास्तव रामचंद्रानें काय छेदिलें ? ( रावणस्य वदनम् ) रावणाचें शिर. राक्षसाच्या कुलांत रात्ररूपी कोण आहे ? ( सीता ) सीता. चंद्रकिरणाचा द्वेष करणारा कोण ? ( वियोगातुर ) स्त्रीच्या वियोगानें आतुर झालेला पुरुष.

याप्रमाणें समस्या पूर्ण केलेली पाहून कालिदासास राजानें मोठें इनाम दिलें.



# गोष्ट ३६ वी

## सोमदत्त पंडिताची निराशा

कालिदासाची वारंवार प्रतिष्ठा वाढत असल्यामुळें त्याची कीर्ति दिगंतरीं झाली. ती ऐकून एका सोमदत्त नांवाच्या विद्वान् ब्राह्मणाला वाटलें कीं, आपण कालिदासाला जिंकिलें असतां आपली कीर्ति त्यापेक्षां शतपट अधिक होईल व भोजराजाच्या सभेंत आपली प्रशंसा होऊन मुख्य पंडिताची जागा आपणांस प्राप्त होईल. अशा हेतूनें तो धारानगरीजवळ येण्याकरितां निघाला. नंतर मजल दर-मजल करीत तो धारानगरीजवळ आल्यावर तेथील पाणवठ्यावर बऱ्याच स्त्रिया पाणी भरण्याकरितां आलेल्या पाहून त्यांतून एका स्त्रियेस 'तूं कोण आहेस?' असा त्यानें प्रश्न केला. तेव्हां तिनें म्हटलें

नैकचक्ररथी सूर्यो भूमौ तिष्ठति सारथिः ॥
अगस्तितातनिर्माणं तस्याहं कुलबालिका ॥ १ ॥

**अर्थ**–एक चाकाचा रथ आहे; परन्तु सूर्य नव्हे व ज्याचा सारथी भूमीवर उभा असतो असा अगस्तिऋषीचा तात जो 'कुंभ' यास उत्पन्न करणारा कुंभार त्याची मी कन्या आहें.

हें ऐकून सोमदत्तास आश्चर्य वाटलें. मग त्यानें दुसरीला तोच प्रश्न केला. तेव्हां तिनें म्हटलें:—

नित्यं जुहोति द्रव्याणि चौर्यकारी दिने दिने ॥
शत्रुमित्रं न जानाति तस्याहं कुलबालिका ॥ १ ॥

**अर्थ**–नेहमीं द्रव्याचा होम करणारा आणि शत्रु व मित्र यांत चोरी करण्याविषयीं भेद न करणारा जो सोनार त्याची मी कन्या आहें.

तें उत्तर ऐकून पंडित फारच आश्चर्यचकित झाला. मग त्यानें तिसरीस प्रश्न केला, तेव्हां ती म्हणाली—

हरहर स्मरते नित्यं बहुजीवप्रतिपालका ॥
अरण्ये वसते नित्यं तस्याहं कुलबालिका ॥ २ ॥

**अर्थ**-हर हर असा शब्द करणाऱ्या जीवांच्या समुदायांचें पालन करून अरण्यांत नेहमीं वास्तव्य करणारा जो धनगर त्याची मी कन्या आहें.

तें ऐकून त्यानें चौथ्या स्त्रियेसही प्रश्न केला, तेव्हां ती म्हणाली:-

बाहुरस्तु शिरो नास्ति न सत्यंगुलिका दश ॥
तस्योत्पत्तिकरो यस्तु तस्याहं कुलबालिका ॥ ४ ॥

**अर्थ**-ज्यास बाहु आहेत परन्तु शिर आणि दहा बोटें मात्र नाहींत असा जो अंगरखा त्यास उत्पन्न करणारा जो शिंपी त्याची मी कन्या आहें.

अशा तऱ्हेनें चारही स्त्रियांचीं उत्तरें ऐकून तो पंडित आपणाशीं म्हणूं लागला कीं, 'ह्या धारानगरींतील स्त्रिया जर इतक्या चतुर आहेत तर ज्याची कीर्ति दिगंतरीं पसरली आहे त्या कालिदासाची विद्वत्ता किती असेल !' असा विचार करीत सोमदत्त पुढें जात असतां दोन हमाल पाठीवर मालानें भरलेलीं पोतीं घेऊन जात असतां थकल्यामुळें पोतीं उतरून दम टाकण्याकरितां बसलेले त्यास आढळले. तेव्हां त्यांपैकीं एकास पंडितानें प्रश्न केला कीं, 'या पोत्यांत काय भरलेलें आहे ? तें ऐकून तो हमाल म्हणाला:—

अर्धं वसति कैलासे अर्धं गायकमंदिरे ॥
तत्सर्वं वणिजागारे यो जानाति स पंडितः ॥ ५ ॥

**अर्थ**-ज्या पदार्थाचें अर्ध कैलास पर्वतावर वास्तव्य करितें व अर्ध गायन करणारे जे गंधर्वादि गवई यांच्या आश्रमांत वास्तव्य करीत असून तो संपूर्णपणें वाण्याच्या दुकानीं मिळतो, असा जो जिन्नस 'हरताळ' तो माझ्या पोत्यांत आहे.

तें ऐकून सोमदत्तानें दुसऱ्या हमालास प्रश्न केला, तेव्हां तो म्हणाला:—

अर्धं वसति शैलाग्रे अर्धं स्त्रीवसनांतरे ॥
तत्सर्वं वणिजागारे यो जानाति स पंडितः ॥ ६ ॥

अर्थ–ज्याचें अर्धं शैल म्हणजे पर्वताच्या अग्रभागीं राहात असतें व अर्धं स्त्रियांच्या वस्त्रांत वास करित असून तो संपूर्ण पदार्थ वाण्याच्या दुकानीं मिळतो, असा जो जिन्नस ' मोरचूत ' तो माझ्या पोत्यांत आहे.

हें भाषण श्रवण करून सोमदत्त फारच चकित होऊन पुढें जाऊं लागला, तों वाटेंत एक स्त्री भेटली. तिच्या ओटींत कांहीं पदार्थ आहे असें जाणून पंडितानें तिजला प्रश्न केला, ' हे स्त्रिये, तुझ्या ओटींत काय आहे ? ' त्यावर ती स्त्री म्हणाली—

वृक्षाग्रवासी न च राजहंसो ।
नारी तु नाम्ना न च राजकन्या ॥
बिभर्ति तोयं न च देवगंगा ।
त्रिनेत्रधारी न च शूलपाणीः ॥ ७ ॥

अर्थ–वृक्षाच्या अग्रभागीं वास्तव्य करणारा असून हंस म्हणजे पक्षी नव्हे, नामेंकरून स्त्री आहे परंतु राजकन्या नव्हे, मध्यंतरीं उदक आहे पण भागीरथी नव्हे, तीन नेत्र आहेत तथापि शूलपाणि ( शंकर ) नव्हे, असा जो पदार्थ नारळ तो माझ्या ओटींत आहे.

हीं उत्तरें ऐकून सोमदत्त अगदींच लज्जीत झाला व कालिदासाशीं स्पर्धा करून फजीत होण्यापेक्षां त्याशीं सख्यत्व करावें हें चांगलें, असा विचार करून त्यानें कालिदासाची भेट घेतली व निरभिमानानें आपला लाभ करून घेतला.



# गोष्ट ३७ वी

## सावकारकन्येचें चातुर्य

एकदां चौघे मित्र रोजगारानिमित्त देशांतरीं फिरत फिरत धारानगरीप्रत आले व तेथील एका धर्मशाळेंत उतरून जेवणाची सोय पाहण्याकरितां त्यांनीं गांवांत जाण्याचा निश्चय केला. तेव्हां त्या मित्रांपैकीं एकानें म्हटलें, "मित्रहो ! मी गांवांत जाऊन जेवणाची सोय करितों, तोंपर्यंत तुम्ही येथेंच विश्रांतीस्तव बसावें." असें म्हणून तो गांवांत गेला व एक मोठें सावकाराचें घर पाहून भोजनाची सोय विचारूं लागला; तेव्हां सावकाराकन्या चंपावती पुढें होऊन त्यास म्हणाली, "तुला भोजन घालून दोनशें रुपये देतें; परंतु तूं कोण आहेस, तें सत्य सांग !" तो म्हणाला, "बाई-साहेब, मी एक गरीब आहे." त्याचें उत्तर ऐकून चंपावती म्हणाली, "ह्या भूमंडळांत फक्त दोन गरीब असतां तूं असत्य भाषण करितोस. जा तुला कांहीं एक मिळणरा नाहीं !" तें ऐकून तो निराश होऊन आपल्या मित्रांजवळ आला व त्यानें झालेली हकीगत सांगितली, तेव्हां दुसरा मित्र म्हणाला, "अंः ! यांत काय आहे ? मी त्या घरी जाऊन भोजनाची सोय करून येतों !" नंतर पहिल्या मित्रास त्या घराची खूण विचारून तो चंपावतीच्या दरवाज्यांत आला आणि "भोजनाची सोय होईल काय ?" म्हणून विचारूं लागला तेव्हां तिनें पुनः तोच प्रश्न केला. त्यावर तो दुसरा मित्र म्हणाला, "बाईसाहेब, मी एक प्रवासी आहे." तें ऐकून चंपावती म्हणाली, "ह्या भूतलावर फक्त दोनच प्रवासी आहेत. तूं असत्य भाषा बोलतोस. म्हणून तुला कांहीं मिळणार नाहीं. चल चालता हो !"

तें ऐकून तोही आपल्या मित्राजवळ परत आला. मग तिसरा मित्र चंपावतीजवळ आला; तेव्हां पूर्ववत् संभाषण होऊन तिने तोच प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला, "बाईसाहेब मी नर आहें." त्यावर चंपावती म्हणाली, "ह्या पृथ्वीवर फक्त दोनच नर असतां तूं मिथ्या भाषण करितोस; तरी तूं येथून चालता हो! तुला कांहीं एक मिळणार नाहीं!" तें ऐकून तोही निराश होऊन मित्रांजवळ आला. तेव्हां चौथा मित्र मनांत म्हणाला, "या बाईस असें सरळ उत्तर देऊन भागणार नाहीं. हिला फसविलें पाहिजे. गांवांत गाढवें पुष्कळ आहेत. तेव्हां आपण गाढव आहोंत म्हणून सांगावें. गाढव सांगितल्यानें गाढव होतो असें नाहीं. कसेंही करून भोजन व दोनशें रुपये उपटावे! असा बेत करून चंपावतीकडे येऊन त्यानें भोजनाची सोय विचारली. तेव्हां तिनें त्यासही तोच प्रश्न केला. तो ऐकून चौथा मित्र म्हणाला, "बाईसाहेब, मी गाढव आहें" तें ऐकून ती म्हणाली, "पृथ्वीवर गाढवें दोनच आहेत तूं असत्य भाषण करितोस. यास्तव तुला कांहीं देणार नाहीं!" असें ऐकून तोही निराश होऊन आपल्या मंडळींत आला.

नंतर त्या चौघांनीं विचार केला कीं, ती स्त्री धूर्त असून अन्न घालीत नाहीं व तिनें आपल्यास फसविलें. आतां सर्वांनीं एकदम जाऊन विचारावें, मग तिला कांहीं दया येऊन तिनें भोजन घातलें तर पाहावें, असा विचार करून ते चंपावतीकडे आले आणि म्हणाले, "बाईसाहेब, आपल्या प्रश्नाच्या नादीं लागून आमचा बराच वेळ मोडला. इतक्या वेळांत दुसरीकडे कोठें सोय झाली असती तेंही आतां शक्य नाहीं. जेवणाची वेळ होऊन गेली. त्यामुळें गांवांत कोठें भोजन मिळेल असें वाटत नाहीं. यास्तव कृपा करून नुसतें भोजन

घालून मार्गस्थ करावें!" तें ऐकून चंपावतीस दया आली व तिनें त्यांजला राहवून घेतलें आणि आपल्या कारकुनास बोलावून आज्ञा केली कीं, 'या चार जणांस उत्तम भोजन घालून मजपाशीं परत घेऊन यावें!' त्या हुकुमाप्रमाणें कारकुनानें त्या चौघांस भोजन घालून चंपावतीकडे परत आणिलें. तेव्हां त्यांस मोठ्या आदरानें बसवून तांबूलादि देऊन तिनें कारकुनास पुनः आज्ञा केली कीं, "या प्रत्येकास एकेक शेला व दोनदोनशें रुपये द्यावेत!" तेव्हां कारकून "म्हणाला बाईसाहेब, आपल्या आज्ञेनें भोजन घातलें; परंतु शेले व रुपये देणें यजमानाशिवाय होणार नाहीं!" तें ऐकून तिला क्रोध येऊन ती त्यास म्हणाली, "जर तूं माझें ऐकलें नाहींस तर तुला ताबडतोब रजा देईन, हें पक्कें ध्यानांत ठेव!" तेव्हां कारकुनास मोठी अडचण पडली. रुपये द्यावे तर धनी रागें भरेल; न द्यावे तर त्याची कन्या लाडकी! तिनें कांहीं कळविलें तर आपली चाकरी जाण्यास उशीर नाहीं! तेव्हां काय करावें, असा विचार करीत असतां त्यानें अशी युक्ति काढली कीं, आपण अगोदर हिचीच बापाजवळ फजिती करावी म्हणजे आपले चाकरीस भय नाहीं. असें मनांत आणून तो धन्याकडे गेला आणि म्हणाला, "महाराज, आपले अब्रूस व कुलीनपणास बट्टा येतो, हें पाहून मला फार वाईट वाटतें! ही गोष्ट खरी किंवा खोटी याचा अनुभव घेणें असल्यास आतां माझ्याबरोबर चलावें. आपल्या मुलीचे चार असामी जार पुरुष आपले वाड्यांत तिचे महालांत आहेत. त्या प्रत्येकास एकेक शेला व दोनदोनशें रुपये देण्याविषयीं चंपावतीनें आज्ञा केली आहे; परंतु तें आपल्या आज्ञेशिवाय घडणार नाहीं, असें मी सांगितल्यामुळें तिला फार राग येऊन ती मला अपशब्द बोलली; परंतु काय करावें? ती

आपली लाडकी कन्या, तिच्या बोलण्याचा राग मानून उपयोग काय ?" असें कारकुनाचें बोलणें ऐकून सावकारास मोठा क्रोध आला आणि कन्येच्या महालीं जाऊन पहातो तों चार पुरुष तेथें एका पलंगावर बसले आहेत, असें पाहून त्यानें त्यांस पहाऱ्यांत ठेविलें आणि तत्काळ भोजराजाजवळ जाऊन ती गोष्ट सांगितली.

भोजराजाच्या मनांत आलें कीं सावकार फारच प्रामाणिक, कुलीन व पापभीरु आहे; तो कधींही खोटें बोलणार नाहीं. तशांत त्याची ही आवडती व एकच कन्या आहे. असें असतां तिजविषयीं तर अशी गोष्ट कधींही सांगणार नाहीं. असें म्हणून त्यानें सेवकास हुकूम केला, "सावकाराच्या घरीं जाऊन जे चार पुरुष तेथें पहाऱ्यांत ठेविले आहेत त्यांस धरून सुळीं द्यावें व त्याच्या कन्येस आणून बंदिखान्यांत ठेवावी !" राजाज्ञेप्रमाणें सेवक त्या पांचजणास धरून नेत असतां हे चौघे मित्र आपसांत म्हणतात, "काय ही अंदाधुंदी पहा ! आपण येथें कांहीं अन्याय केला नसतां सुळीं देण्याची आज्ञा ! काय हा जुलूम !" तेव्हां चंपावती म्हणाली, "तुम्ही कांहीं भिऊं नका, स्वस्थचित्तेंकरून राजवाड्यांत चलावें !" असें त्यांस सांगून ती राजाच्या सेवकांस म्हणाली, "बाबांनो, तुम्ही आम्हांस प्रथम राजाजवळ न्यावें. कारण आम्हांस राजाजवळ कांहीं बोलावयाचें आहे. मग तुम्हांस जशी राजाज्ञा होईल तसें करा !"

तें ऐकून राजसेवकांनीं त्या पांचजणांस राजासमोर आणून उभें केलें. तेव्हां चंपावती म्हणाली, "राजा, आमच्या अपराधाची चौकशी करावी व न्याय करावा. चौकशीशिवाय शासन करणें ही राजनीति नाहीं. यास्तव चौकशी करून खरा न्याय करावा !" असें तिचें बोलणें ऐकून राजानें त्या चौघांस विचारलें कीं,

" तुम्हांस त्या सावकाराच्या घरीं येण्याचें कारण काय ? " तेव्हां त्या सर्वांनीं खरी हकिकत सांगितली. ती ऐकून राजानें सावकार-कन्येस विचारलें, " येथें गरीब पुष्कळ असतां तूं दोनच म्हणतेस हें कसें ? " तेव्हां चंपावती म्हणाली, " राजा, जगांत गरीब दोनच आहेत. एक धेनु व दुसरी कन्या. कारण धेनु व कन्या ज्याच्या स्वाधीन करावी त्याच्याबरोबर जाणें त्यांना भाग पडतें. मग तो कसाई असो किंवा नपुसंक वा दरिद्री असो ! " हें ऐकून राजा म्हणाला, "गोष्ट खरी आहे." नंतर " प्रवासी पुष्कळ असून तूं दोनच आहेत म्हणतेस हें कसें ? " असें राजानें विचारलें. तेव्हां ती म्हणाली, "राजा, खरे प्रवासी दोनच आहेत; एक सूर्य व दुसरा चंद्र. याशिवाय या त्रिभुवनांत दुसरे प्रवासी नाहींत ! " तेव्हां राजास आश्चर्य वाटून " त्यानें दोन नर कोणते ? " म्हणून सावकारकन्येस विचारलें. तेव्हां ती म्हणाली, " राजा, नर पाहिलें असतां दोनच आहेत. ज्यास स्तन नाहींत तो नर असें शास्त्रांत सांगितलें आहे. वास्तव तसे नर दोनच, घोडा व अर्जुन ! याशिवाय तिसरा नर या भूमंडळावर नाहीं ! " या उत्तरानें राजा आश्चर्यचकित झाला व शेवटच्या उत्तरांतील " दोन गाढव कोणते ! " असें त्यानें तिला विचारलें. तेव्हां ती म्हणाली, " राजा, त्याचें उत्तर देण्यापूर्वी मला आपलें अभय असेल तर सांगतें ! " तेव्हां राजानें अभय दिल्यावर ती म्हणाली, " महाराज माझ्या कारकुनानें सांगितलेल्या हकि-कतीची चौकशी न करितां माझ्या बापानें आपल्याजवळ फिर्याद केली म्हणून तो एक गाढव व आपण प्रभु; सर्व आबालवृद्धांचा समाचार घेणें आपलेकडे आहे. याविषयीं म्हटलें आहे कीं,

पक्षीणां बलमाकाशं मत्स्यानामुदकं बलम् ॥
निर्बलानां बलं राजा बालानां रोदनं बलम् ॥ १ ॥

अर्थ--पक्ष्यांना आधार आकाश, माशांना आधार पाणी, निर्बलांना आधार राजा व लहान बालकांना आधार रडण्याचा.

माझ्या बापाची फिर्याद एकून न्याय न करितां एकदम सुळीं देण्याची आपण आज्ञा दिली यास्तव आपणच दुसरे गाढव ! आतां आपणांस योग्य दिसेल तें करावें. आमची खरी हकिगत विदीत केली आहे ! ” हें ऐकून राजा म्हणाला, हरहर ! आपल्यास धिक्कार असो ! आज माझ्या मूर्खपणानें चार प्रवासी विनाकारण मारले जात होते; परंतु परमेश्वरकृपेनें ते वांचले ! ” असें म्हणून त्यानें सावकारकन्येची क्षमा मागितली व तिला घरीं जाण्याची आज्ञा दिली व त्या चौघां मित्रांस वस्त्रालंकारादि देऊन आणि त्यांस कांहीं कामगिरी सांगून आपल्या पदरीं ठेवून घेतलें.



## गोष्ट ३८ वी

### सावकारकन्येची परीक्षा

वरील गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर भोजराजाच्या मनांत त्या सावकारकन्येच्या पातिव्रत्याविषयीं परीक्षा करण्याचें आलें व त्यानें आपल्या एका चतुर सरदारास तें काम सांगितलें. म्हणून एके दिवशीं ती घरांत एकटीच महालांतील खिडकीजवळ बसून रस्त्याची शोभा पाहात आहे अशी संधि साधून तो सरदार तिजपाशीं जाऊन म्हणाला,

ऐके पंचमलोचने मम सखे बारावया इच्छितों ।
तेरांची गति चालतां हळहळू चौदापरी भासत्ये ॥
टाकीतों तुज एक शब्द परिसे बावीस पात्रीं कदा ।
आतां घेउनि तेविसास सदनीं यावें प्रिये एकदां ॥ १ ॥

अर्थ--( पांचवें नक्षत्र मृग यास्तव ) हे मृगलोचने, माझे सखे ( बारावें नक्षत्र उत्तर खालीं उतरून ये असें मी इच्छितों. [ तेरावें नक्षत्र हस्त ] तुझें गज-गति चालणें पाहून तूं मला [ चवदावें नक्षत्र चित्रा म्हणून ] चित्राप्रमाणें दिसतेस. यास्तव तुजवर एक शब्द टाकतों. [ बाविसावें नक्षत्र श्रवण ] तो श्रवण कर. तेविसावें नक्षत्र धनिष्ठा ] आतां तूं हें द्रव्य घे, परंतु एकदां माझ्या घरीं ये !

याप्रमाणें त्या सरदाराचें भाषण श्रवण करून चंपावती फार क्रोधायमान झाली; परंतु ती मोठी चतुर असल्यामुळें तिनें विचार केला कीं, या मूर्खाशीं भाषण न केलें तर नित्यशः माझ्या प्राप्ती-करितां झुरणीस लागून कदाचित् हा मरणहि पावेल. असें जाणून तिनें म्हटलें :—

ऐके रे दुसऱ्या करीन म्हणसी तें तीसरें तूं मला ।
पांचांची निजशक्ति जाण बरवी ती प्राप्त कैची तुला ॥
खर्चीशी नववें तरी न पडती दृष्टीस माझीं नखें ।
अकराव्या प्रति घेऊनी मम गृहीं वाहोनि राहें सुखें ॥२॥

अर्थ--[ दुसरी रास वृषभ ] हे वृषभा [ बैला ], ऐक तूं मजशी [ तिसरी रास मिथुन ] मैथुन करीन म्हणतोस ! परंतु मी कशी आहें म्हणशील तर श्रवण कर. ( पांचवी रास ) सिंह सर्व श्वापदांचा राजा सिंह त्याची मी शक्ति म्हणजे पत्नी आहें. ती तुला कशी प्राप्त होईल? आतां मी तुला प्राप्त व्हावें या हेतूनें [ नववी रास धन ] पुष्कळ द्रव्य खर्च करशील, परंतु माझीं नखेंहि तुझ्या दृष्टीस पडणार नाहींत. तुझ्या मनांत नित्यशः माझें दर्शन घ्यावें असें असल्यास ( अकरावी रास कुंभ ) घागर डोक्यावर घेऊन माझ्या घरीं पाणी वाहून स्वस्थ राहावें.

असें सावकारकन्येचें भाषण ऐकून सरदार तिला उत्तर देतोः-

घेईन मी त्या अकरावियासी ।
परी तिजें साध्य करीन तूशीं ॥
संस्कार वैश्वानर ज्यास नाहीं ।
षण्मास मी वाहिन त्यास पाहीं ॥३॥

**अर्थ**—( अकरावा जो कुंभ ) ती घागर मस्तकीं धारण करून तुजसंगें तिसरें म्हणजे मैथुन हें साध्य करीन. तो कुंभ कसा धारण करीन म्हणतेस जर ज्याला वैश्वानर म्हणजे अग्नि याचाहि संस्कार झाला नाहीं असा जो कच्चा घडा त्यानें सतत सहा महिने पाणी वाहीन.

याप्रमाणें त्याचें भाषण श्रवण करून चंपावती म्हणाली:— हे मूर्खा, श्रवण कर—

अकरावियासी शिरीं त्वां न ध्यावें ।
कां खर्च मूर्खा नववें करावें ॥
तया तीसऱ्यामाजि तें सौख्य नाहीं ।
तूं आपुलीया गृहिं स्वस्थ राही ॥ ४ ॥

**अर्थ**—मला असे वाटतें कीं, अकरावा जो कुंभ त्यास तूं मस्तकावर धारण करण्याचा व नववें म्हणजे धन हेंही खर्च करण्याचा हेतु मनांत बाळगूं नकोस. कां म्हणशील तर इतकें कशाकरितां करावयाचें तर फक्त तिसरें म्हणजे मैथुन याकरितां ! तर तुला सांगतें, घरीं स्वस्थ चित्तेंकरून गमन करावें.

असें तिचें भाषण ऐकून सरदार लज्जायमान होऊन तेथून निघून गेला व त्यानें ती सर्व हकिगत राजास सांगितली. तेव्हां तिच्या गुणाबद्दल त्याची चांगलीच खात्री झाली.

## गोष्ट ३९ वी

### उपदेशपर गोष्टीची किंमत

एका खेडेगांवांत सुदर्शनभट्ट नामें एक अविद्वान् भिक्षुक ब्राह्मण राहात असे. तो फारच गरीब स्थितींत असल्यामुळें त्यानें आपल्या बायकोस मुलांसह तिच्या माहेरीं पाठवून दिलें व आपणांजवळ शिल्लक असलेल्या तीन मोहरा घेऊन तो भिक्षुकीकरितां देशांतरास निघाला. पुढें मार्गांत त्यास एक गोसावी भेटल्यावर तो गोसावी आणि सुदर्शनभट्ट मार्ग क्रमीत असतां भट्ट म्हणाला, "बुवाजी,

एखादी गोष्ट सांगा म्हणजे मार्गांत करमणूक होऊन वेळ जाईल !"
तेव्हां गोसावी म्हणाला, "माझ्या एका गोष्टीस एक मोहोर लागते. ती घेतल्याशिवाय मी कधींच गोष्ट सांगत नसतों !"
ब्राह्मणाजवळ फक्त तीन मोहोरा होत्या. त्यांतून एक मोहोर देण्यास तो कबूल होऊन गोष्ट सांगण्याविषयीं गोसाव्याची त्यानें प्रार्थना केली. तेव्हां गोसावी गोष्ट सांगूं लागला. तो म्हणाला, "चौघे सांगतील तसें ऐकावें. झाली गोष्ट. टाक एक मोहोर !"

सुद०–अहो बुवाजी, हें काय ? अशी कशी तुमची गोष्ट ?

गोसावी–आमची गोष्ट अशीच. लवकर मोहोर दे !

सुद०–( मोहोर देऊन ) बुवाजी, दुसरी एखादी चांगली सांगा.

गोसावी–अहो भटजीबुवा, दुसरे गोष्टीस दुसरी मोहोर पडेल !

सुद०–दुसरी मोहोर देईन. गोष्ट मात्र चांगली सांगा !

गोसावी–बायकोजवळ कधीं गुप्त गोष्ट सांगूं नये. टाक मोहोर !

सुद०–गोसावीबुवा, हें हो काय ? तुम्ही मला ठकवितां. अहो, दोन चार शब्द बोललांत त्याबद्दल एक मोहोर घेतां काय ? माझ्या मनांत तुम्ही एखादी लांबलचक गोष्ट सांगाल !

गोसावी–अहो भटजीबुवा तुमच्या मोहोरा फुकट गेल्या असें समजूं नका ! ह्या गोष्टी एखादे वेळेस तुमच्या उपयोगी पडतील.

सुद०–पुढें पडतील तेव्हां पडतील. परंतु सध्यां मोहोरा गेल्या खऱ्या ! ( असें म्हणून दुसरी मोहोर काढून देतो. ) आतां मजजवळ फक्त एकच मोहोर शिल्लक आहे. तरी आतां एक तिसरी गोष्ट तरी चांगलीशी सांगा म्हणजे मी तुम्हांस राहिलेली तिसरी मोहोर देतों. मग मलाहि मार्गांत लुटारूंचें भय राहणार नाहीं. रात्रौ स्वस्थपणें झोंप तरी येईल.

गोसावी—एक तर माझी तिसरी गोष्ट. राजासमोर सत्य भाषण करावें. झाली गोष्ट. टाक मोहोर !

तेव्हां निरुपायानें तिसरी मोहोर देऊन सुदर्शनभट्ट मनांत म्हणाला, 'ह्या गोसाव्यानें मला फसवून तिन्ही मोहोरा काढून घतल्या. असो; झालेल्या गोष्टीस इलाज नाहीं. आपल्या नशिबीं असल्यास कोठें तरी मिळवूं. आपली भिक्षा कायम आहेच !'

नंतर त्या दोघांची वाट फुटली. ब्राह्मण एका मार्गानें व गोसावी दुसरा मार्गानें गेला. मग सुदर्शनभट्ट फिरत फिरत एका खेडेगांवीं आला. तेथें एक बैरागी मेला होता व त्या ठिकाणीं बरेच लोक जमले असून त्यास कोणी हात लावीत नव्हते. तेव्हां तेथील लोकांनीं ह्या भिक्षुक ब्राह्मणास पाहून हांक मारिली आणि सांगितलें कीं. 'अरे ब्राह्मणा, ह्या गोसाव्याचें प्रेत नदींत नेऊन टाक !' तेव्हां सुदर्शनास वाटेतील गोसाव्यानें सांगितल्यापैकीं 'चौघे सांगतील तसें एकावें,' ही पहिली गोष्ट आठवली. तेव्हां चौघांच्या सांगण्याप्रमाणें त्यानें तें प्रेत उचललें व नदींत टाकीत असतां त्या प्रेताचे कमरेस फडक्यांत बांधलेलीं तीन अमोल रत्नें त्यास आढळलीं. तीं त्यानें काढून घेतलीं व गोष्ट सांगणाऱ्या गोसाव्याचे उपकार मानून तो पुढें चालूं लागला.

बराच दूर गेल्यावर त्यानें तीं रत्नें सोडून निरखून पाहिलीं. तीं अमूल्य रत्नें पाहून सुदर्शनभट्ट मनांत विचार करूं लागला कीं, आपणांस आतां प्रवासास जाण्याचें कारण नाहीं. तसेंच स्वदेशीं जाऊनहि उपयोग नाहीं. तें लहानसें खेडें असल्यामुळें आपल्या मुलांचा तेथें चांगला विद्याभ्यास होणार नाहीं. तरी आपण धारा-नगरीत आपल्या सासऱ्याचेच घराजवळ जाऊन राहिलों असतां तेथें

मुलांचा अभ्यास चांगला होईल. असा विचार करून मजल दर-मजल करीत तो धारानगरींत आला व एका सावकाराकडे जाऊन त्यानें एक रत्न विकलें. त्याची किंमत २ लाख रुपये मिळाली. तेव्हां त्या द्रव्यांतून त्यानें आपणांस राहण्याकरितां एक मोठा वाडा विकत घेतला व घरांत सर्व पदार्थांची सिद्धता करून आपल्या बायकोस व मुलांस तेथें आणून त्यांसहि नाना प्रकारची वस्त्रेंभूषणें करून तो मोठ्या डामडौलानें राहूं लागला.

अशा तऱ्हेनें एकदम श्रीमंती आलेली पाहून एके दिवशीं सुदर्शनभटजीच्या स्त्रीनें एकांतीं प्रश्न केला, " आपण अगदीं गरीब स्थितींत असतां तुम्हीं इतके द्रव्य कोठून आणलें ? " त्या वेळीं त्या बायकोजवळ कधीं गुप्त गोष्ट सांगूं नये ! " ही गोसाव्याची दुसरी गोष्ट आठवली व त्या गोष्टीची प्रचीति पाहण्याकरितां तो आपल्या स्त्रियेस म्हणाला, " प्रिये, तूं तें विचारूं नकोस. स्त्रियांचे तोंडीं गुप्त गोष्ट राहूं शकत नाहीं; म्हणून त्याबद्दल तूं आग्रह करूं नकोस ! " तेव्हां त्याची स्त्री म्हणाली,

" महाराज, आपली गुप्त गोष्ट मी कधी कोणाजवळ बोलणार नाहीं. तुम्हीं त्याविषयीं निष्काळजी असावें. " हें ऐकून ब्राह्मण म्हणाला, " ऐक तर. मी दररोज प्रातःकाळीं उठून सव्वा शेर तीळ घेतों आणि रानांत जाऊन रुईच्या चिकांत भिजवून ते भक्षण करितों. नंतर मला शौचास होतें, त्यावाटें मोहरा व पुतळ्या बाहेर पडतात. त्या भरून घेऊन येतों. ही युक्ति मला एका सिद्धाने सांगितली. म्हणून प्रवासास न जातां येथेंच आलों ! " नवऱ्याचे भाषण खरें वाटून तिला मोठा आनंद झाला.

नंतर कांहीं दिवसांनीं सुदर्शनभटजींची मेहुणी आपल्या बहि-णीच्या समाचाराकरितां आली. तेव्हां बहिणीचें तें ऐश्वर्य पाहून ती

म्हणाली, "ताई, तुझा नवरा भिक्षुक असतां त्यानें हें द्रव्य कोठून संपादन केलें ?" तेव्हां भटजीची स्त्री म्हणाली, "तें तुला सांगतां येणार नाहीं. कारण माझ्या भ्रताराने ती हकिकत कोणाजवळ न सांगण्याविषयीं ताकीद केली आहे." तेव्हां तिची बहीण म्हणाली, "पण मजजवळ तें सांगण्यास काय हरकत आहे ? मी कोणाजवळ बोलणार नाहीं. माझे गळ्याची शपथ. या मंगळसूत्राची शपथ !" अशा प्रकारें अनेक शपथा घेऊन तिनें आपल्या बहिणीचें मन वळविलें. तेव्हां सुदर्शनभटजीचे स्त्रीनें नवऱ्यानें सांगितलेली हकिकत आपल्या बहिणीस कळविली व "कोणाजवळ बोलूं नको; तुला माझ्या गळ्याची शपथ आहे !" असें म्हटलें.

नंतर ती बहीण आपल्या घरीं गेल्यावर तिनें आपल्या नवऱ्यास ती हकिगत सांगून द्रव्य मिळविण्याकरितां तसेंच करण्यास सांगितलें. त्यानेंहि त्या गोष्टीचा फारसा विचार न करितां दुसऱ्या दिवशीं पहांटेस उठून सव्वा शेर तीळ घेतले व अरण्यांत जाऊन रुईचे चिकांत ते भिजविले आणि द्रव्याच्या आशेस्तव मोठ्या संकटानें ते सर्व खाऊन शौचास होण्याची तो वाट पाहूं लागला; परंतु एक प्रहरानें त्याच्या सर्वांगाची लाही होऊन गेली व त्यास कांहींच सुचेनासें झालें. तेव्हां जेमतेम त्यानें घरची वाट सुधारली.

इकडे त्या बहिणीनें घरांत सर्व झाडलोट करून दोन जुन्या पेट्या स्वच्छ धुऊन लख्ख करून ठेविल्या व भोजनाची सर्व तयारी करून ती पतीची वाट पहात बसली. इतक्यांत नवऱ्याची स्वारी दरवाजांत येऊन थडकली. त्यास दुरून पाहतांच ही दरवाजांत हास्यवदनानें आरती घेऊन उभी राहिली. ती दृष्टीस पडतांच त्यास अतिशय क्रोध येऊन तो ओरडून तिला म्हणाला, "स्त्रीबुद्धिः प्रलयगता !

तुझ्या बुद्धीनें मी माझे आयुष्याचा शेवट मात्र करून घेतला !" इतकें बोलत आहे तोंच त्यास पटापट वांत्या आणि जुलाब होऊं लागले. त्यायोगें सुमारें दोन घटकांनी त्याचा प्राणान्त झाला. तेव्हां त्याच्या स्त्रीनें आक्रोशानें राजदरबारीं जाऊन फिर्याद केली.

ती फिर्याद ऐकून राजानें शिपाई पाठवून सुदर्शनभटजी व त्याची स्त्री यांस बोलावून आणिलें. राजदरबारी येतांच सुदर्शन भटजीस गोसाव्याची तिसरी गोष्ट आठवली. त्या गोष्टीस अनुसरून भटजीनें एकंदर सर्व खरी हकिगत भोजराजास कळविली व आपल्या जवळ असलेलीं दुसरीं दोन रत्नेंहि दाखविलीं. तेव्हां भोजराजानें सुदर्शनभटजी व त्याची स्त्री यांस निरपराधी ठरवून त्यांची रवानगी केली व त्याच्या मेहुणीस म्हटलें, "तूं अविचारानें व द्रव्यलोभानें आपल्या पतीच्या प्राणास घातक झालीस. तसेंच तुझा पति मूर्ख-त्वानें स्त्रीबुद्धीस लागून मरण पावला ! " असें सांगून त्यानें तिला लावून दिलें.

इकडे सुदर्शनभटजी घरीं आल्यावर आपल्या स्त्रियेस म्हणाला, " पहा, स्त्रियांच्या तोंडीं गुप्त गोष्ट राहात नाहीं असें मी म्हटलें होतें त्याचा अनुभव ! केवढा अनर्थ तूं केलास ! " हें ऐकून त्याची स्त्री लज्जायमान होऊन त्याच्या आज्ञेत नेहमीं राहूं लागली. नंतर भटजीनें आपल्या मेहुणीसहि अन्नवस्त्र पुरवून तिचा चांगल्या प्रकारें सांभाळ केला.

— समाप्त —

मुद्रक : दिलीप ज्ञानेश्वर पाठक, जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गिरगांव, गायवाडी, मुंबई ४
प्रकाशक : दिलीप ज्ञानेश्वर पाठक, जगदीश्वर बुक डेपो, माधवबाग, मुंबई ४
आवृत्ति ७ री ]  [ पुनर्मुद्रण १९७९